फटकवायचं, म्हणजे त्याला बरोबर ते कळतं. मी आजपर्यंत बरीच कुत्री शिकवली आहेत. माझ्याकडं मागं एक कुत्रा होता. मी बाहेरनं आलो, की तो दारात उभा असायचा. हालायचा नाही. मी हात वर केला, की सुसाट पळत यायचा. पायांत लाडानं घोटाळायचा. अंगावर उड्या मारायचा. परत हात वर केला, की निमूटपणं जाग्यावर जाऊन बसायचा. बाहेर निघाल्यावरही तसंच. काही अंतरावर तो बरोबर यायचा. 'जा', म्हटलं, की परत जाऊन बसायचा—हे सगळं शिक्षण मघाच्या नियमानंच केलं. जे नकोय त्याच्यासाठी चिक्कार फटकवायचं. हवं ते केलं की लाड करायचे.''

''त्याच्याशिवाय दुसरी काही पद्धत नाही का ?''

''नाही बुवा ! तुम्हांला कुत्र्याला शिकवायचं असेल, तर त्याला कडक शिस्तच लावायला हवी.''

एक तर, मी त्याला फटकावणं शक्य नव्हतं. दुसऱ्या कोणी फटकवायचं म्हटलं तरी मुक्ता थोडंच तसं करू देणार होती !

तिसऱ्या दिवशी ते वेगळाच गुण दाखवू लागलं. आतापर्यंत मुक्ता व इतर मुली लाडानं त्याचे हाल करायच्या, ते निमूटपणं सहन करायचं. आता ते गुरगुरू लागलं. त्याला मी इकडून तिकडं हाकलू लागलो, की ते अंगावरही येऊ लागलं. मुक्ता जरा कावरीबावरी झाली होती. तरी पण कुत्रं पाळण्याचा तिचा उत्साह कमी होत नव्हता. मुक्तापेक्षा लहान मुलगी यशोदा तेव्हा तान्ही होती. ती पहुडलेली असताना हे पिलू तिच्याशी मस्ती करू लागलं. एकदा तर तिच्या हाताला त्यानं ओचकारलं. नशीब, नुसता बारीक ओरखडा उठला होता. रक्त निघालं असतं तर इंजेक्शन द्यावं लागलं असतं.

आता मात्र ठरवलं, की बास झालं. हे कुत्रं सोडून द्यायचं. आमची अम्मा जवळच्या झोपडपट्टीत राहायची. तिला सांगितलं, ''येता जाता हे पिलू कुठंतरी सोडून ये.'' अर्थात हे सर्व मुक्ताच्या पश्चात. कुत्रं नेलं. तिच्या वस्तीच्याही पुढं बरंच अंतर जाऊन सोडून दिलं. आम्ही नि:श्वास टाकला. पण अम्मा संध्याकाळी कामाला आली, तर तिच्या स्वागताला ते पिलू आधीच आमच्या दारात हजर !



मग अम्माच्या नवऱ्याला—अप्पाला—सांगितलं, '' तू सायकलवर जा आणि या पिलाला आणखी लांब कुठंतरी सोडून ये.''

एव्हाना त्या पिलाला आणि मुक्तालाही काय चाललंय याची कल्पना आली होती. मुक्ताला आम्ही कसंबसं समजावलं. 'दुसऱ्या घरी पाळायला देऊ, मोठं झाल्यावर आणू', असं काहीतरी कारण सांगितलं. अप्पानं त्याला पिशवीत घातलं. घालताना पिलानं इतका त्रास दिला, की बस ! पायच बाहेर ठेवायचा. संपूर्ण आत घातल्यावर उडी मारून परत बाहेर. कसंबसं कोंबून पिशवी सायकलला लावून अप्पा गेला. दोन-तीन किलोमीटर अंतरावर जाऊन सोडून आला.

दुसऱ्या दिवशी घरी येऊन मी कपडे काढतोय, तो घरातून येऊन पिलू माझ्यासमोर उभं ! त्याचे डोळे फार बोलके होते. एकाच वेळी जिंकल्याचा भाव आणि करुण छटाही होती. मी त्याच्याकडं लक्षच दिलं नाही. परत परत पायांत येत होतं. मी पायानंच दूर करून पुढं जात होतो.

रात्री ठरवलं, आपण स्कूटरवरून याला लांब सोडू. मग कसं परत येईल ? अप्पाला बेत सांगितला. मुक्ता झोपल्यावर आम्ही पिशवीत पिलू घातलं. कालच्या अनुभवावरून अप्पा पिलू पिशवीत कोंबण्यात तरबेज झाला होता. पिशवी पुढं पायांपाशी स्कूटरच्या हूकला लावली. मी स्कूटर सुरू करतो तोच ते पिलू पिशवीतून बाहेर पडून फुटबोर्डावर आलं होतं. पण स्कूटर एव्हाना वेगात सुरू झाली होती. ते दबकून तसंच उभं होतं.

सहा-सात किलोमीटर स्कूटर दामटली. कुठं सोडायचं त्याचा विचार आधीच करून ठेवला होता. त्याला मोकळ्यावर सोडण्यापेक्षा एखाद्या झोपडपट्टीनजीक सोडावं, म्हणजे त्याला कुठंतरी आसरा मिळेल. निदान उकिरड्यातलं तरी खाऊन जगेल. झोपडपट्टी घरापासून पुरेशी लांबही होती. रात्री दहाचा सुमार होता. झोपडपट्टीच्या जरा पुढं गेलो. रस्त्यावरच्या दिव्यापाशी स्कूटर हळू करून थांबवली. मनाचा निर्धार करून मी फुटबोर्डवरचं पिलू उचललं, रस्त्यावर ठेवलं आणि गर्रकन स्कूटर वळवली व परतू लागलो. काही अंतर ते जीव खाऊन आमचा पाठलाग करत होतं; पण

स्कूटर वेगानं सोडली तसं ते मागं पडलं आणि आम्ही घरी आलो. सकाळपर्यंत ते परत आलं नाही.

सकाळी बाहेर पडताना त्याच रस्त्यानं जायचं होतं. कुतूहल म्हणून पिलू दिसतंय का पाहू या, म्हणून विचार करत होतो. झोपडपट्टीच्या अलीकडं रस्त्यावर ते दिसलं. डोक्यावरच्या ठिपक्यावरून मी त्याला ओळखलं. त्याचा जबडा हसल्यासारखा जमिनीवर पसरला होता. पोटातल्या आतड्यांची दोरी लांबवर गेली होती. झोपडपट्टीच्या अलीकडं म्हणजे आमच्या घराकडं ते येत असताना त्याला अपघात झाला असावा.

आता ते पिलू कधीच येणार नाही, याची चुटपूट माझ्या मनाला लागली.

सकाळी मुक्ता शाळेत जात असल्यामुळं रात्रीनंतर दुपारीच ती भेटली. म्हणाली, "बाबा, राजूला सोडून आलात ना ?"

"हो."

"त्याला सांभाळायला दिलंत ना ?"

"हो."

जरा वेळ ती इकडंतिकडं करत होती. संध्याकाळी परत बाहेर जायला निघालो. मुक्तानं गडबडीनं एक छोटं गाठोडं आणून दिलं. म्हणाली, "यात त्याची दुपटी आहेत. ती त्याला नेऊन द्या." परत आत जाऊन चुरगळलेल्या कागदाची एक पुडी आणून दिली व म्हणाली, "यात फुटाणे आहेत."

मी मान हालवली आणि स्कूटर सुरू केली.

दोन-चार दिवसांत ती राजूला विसरली; पण मी मात्र त्याला विसरू शकलो नाही.

जे घडलं त्यामुळं आता कितीही गोजिरवाणं पिलू दिसलं तर उचलून घेणं राहोच; पण त्याला साधा हात लावायचं धाडस मला होत नाही.

लेखक -अनिल अवचट



मराठी
बालभारती : इ. ७ वी
दुसरी माला : १९८६



# ६. हृदयाची श्रीमंती

एकदा एक भिकारी भीक मागत राजधानीत आला. त्याने कधी राजा पाहिला नव्हता. राजवाडा पाहिला नव्हता. फिरत फिरत तो राजवाड्यापाशी आला.

त्या दिवशी त्याची झोळी जवळजवळ भरत आली होती. तिच्यात तांदूळ होते, जोंधळे होते, सत्तू होते, गहू होते. त्याला वाटले—अजून झोळीत दोन-तीन मुठी धान्य राहील. ते राजापाशीच का मागू नये ? त्याच्या संग्रही कदाचित आपण कधीही न पाहिलेले धान्य असेल. ते आपल्याला पाहायला मिळेल, खायला मिळेल. शिवाय, 'महाराज, महाराज' म्हणून देशातले सारे लोक ज्याचे नाव आदराने उच्चारतात, तो कसा आहे, हेही आपल्याला सहजासहजी दिसेल; पण प्रवेशद्वारापाशीच रक्षकांनी त्याला रोखून धरले.

भिकारी हसत सुटला. या लोकांना वेड तर लागले नाही ना, असा विचार त्याच्या मनात आला. तो प्रमुख रक्षकाला म्हणाला, "भाई, पागल आणि गुन्हेगार मोकाट सुटू नयेत, म्हणून पागलखाना आणि तुरुंग यांच्या दारांवर रक्षक ठेवतात, असं मी ऐकलं होतं. राजवाड्यात त्यांची काय जरूर आहे ? कारभाराच्या सोईसाठी राजानं तुरुंग आणि पागलखाना हे हल्ली राजवाड्यातच तर आणून ठेवले नाहीत ?"

बोलता बोलता भिकाऱ्याने त्या रक्षकाच्या खांद्यावर हात ठेवला. त्याने तो झटकन दूर केला. चार फटके देऊन त्या भिकाऱ्याला हाकलून देण्याची रक्षकांच्या त्या नायकाला तीव्र इच्छा झाली. हाताखालच्या लोकांना तो तशी आज्ञा करणार, तो स्वतः राजाच तेथे आला.

राजा दरबारला जायला निघाला होता. राजाला पाहण्याची भिकाऱ्याची इच्छा ऐकताच तो म्हणाला, "चल माझ्याबरोबर."

आजचा दरबार राजाच्या वाढदिवसानिमित्त भरला होता. राजा सिंहासनावर जाऊन बसला. भिकाऱ्याला त्याने आपल्या जवळच्या आसनावर

बसण्याची खूण केली. सारी सभा चकित होऊन पाहू लागली. मेघांच्या गडगडाटाला लाजवील असा टाळ्यांचा कडकडाट दरबारात झाला.

राजापुढे एकामागून एक उंची उपायने येऊ लागली. डोळे दिपवणारी रत्ने, एकदा तरी स्पर्श करून पाहावा असे वाटायला लावणारी वस्त्रे, नाना तऱ्हांच्या आणि नाना आकारांच्या असंख्य वस्तूंचे संमेलनच जणू काही आज तिथे भरले होते.

भेटी देण्याचा समारंभ संपला.

राजाने भिकाऱ्याकडे पाहिले. सुंदर सरपोसांनी झाकलेल्या विविध वस्तूंवरून भिकारी पुन्हा पुन्हा आपली दृष्टी फिरवत होता. राजा हसत हसत भिकाऱ्याला म्हणाला, ''तुला काय हवं, ते माग.''

भिकारी त्या साऱ्या उंची, सुंदर वस्तूंकडे टक लावून पाहत उभा राहिला.

''माग, हवं ते माग,'' राजा उद्‌गारला.

भिकारी स्तब्ध होता.

''माग, मित्रा, माग. या सुंदर वस्तूंपैकी कोणतीही.''

भिकाऱ्याच्या ओठांची हालचाल झाली. आता तो काही बोलणार असे वाटताच, राजा एकदम दचकला.

''मागू ? हवं ते मागू ?'' भिकाऱ्याने गंभीर स्वराने प्रश्न केला.

राजा मनात गडबडला. वाढदिवसाची भेट म्हणून आलेल्या साऱ्या वस्तूंकडे भिकारी मघापासून अधाशी नजरेने पाहत होता. राजाला वाटले— या साऱ्या उंची, मूल्यवान वस्तू त्यानं मागितल्या तर ? आणि एवढ्या वस्तूंनी तरी त्याचं समाधान होईल, याची खात्री काय ? बोलूनचालून भीक मागणारा माणूस ! हा प्राणी कधीतरी उंची, झुळझुळीत वस्त्रं नेसला असेल काय ? मुकुट राहू द्या; पण हाताच्या बोटात अंगठी घालण्याची संधीसुद्धा त्याला कधी मिळाली नसेल. या उपाशी आणि अधाशी माणसानं आपलं सारं राज्य मागितलं तर ?

राजा काहीच बोलत नाही, असे पाहून भिकारी पुन्हा उद्‌गारला, ''मागू ?



मागू महाराज ?''

सारी सभा तटस्थ झाली. सभेतले पंडित मनात म्हणत होते—महाराजांनी उगीच शब्द दिला या वेड्याला. पूर्वी बळीनं वामनाला असंच वचन दिलं. त्या वचनापायी त्याला स्वत:ला पाताळात गाडून घ्यावं लागलं.

राजाचे डोळे लकाकले. सभा अधिकच उत्सुक झाली.

राजा हसत म्हणाला, ''मित्रा, तुझ्या कुटुंबात किती मंडळी आहेत ?''

''मला कुटुंबच नाही महाराज.''

''माझी स्थिती तुझ्या अगदी उलट आहे. सारी प्रजा हे माझं कुटुंब आहे. कुणी कुबेराची संपत्ती मला दिली, तरी या कुटुंबातल्या प्रत्येकाच्या वाट्याला कवडी कवडी तरी येईल की नाही, याची मला शंका आहे. म्हणून वाढदिवसाच्या निमित्तानं मी हे नजराणे स्वीकारत आहे.''

राजा थांबला. भिकारी गोंधळला.

राजा पुढे बोलू लागला, ''माझ्या या मोठ्या कुटुंबाकरिता मिळेल तेवढी संपत्ती मला हवीच आहे. मित्र म्हणून आज तूसुद्धा मला काहीतरी भेट द्यायला हवीस. खरं की नाही ?''

भिकाऱ्याच्या मुद्रेवर कारुण्याची छाया पसरू लागली. त्याने मान खाली घातली. थोड्या वेळाने मान वर करून त्याने राजाकडे अश्रुपूर्ण नेत्रांनी पाहिले.

भिकाऱ्यापुढे दोन्ही हात पसरून राजा उद्‌गारला, ''दे, मित्रा, वाढदिवसाची भेट दे. कसलीही—काहीही.''

भिकाऱ्याचे डोळे एकदम चमकले. एखाद्या विजयी सेनापतीप्रमाणे तो डौलाने पुढे झाला आणि खांद्याला अडकवलेली झोळी त्याने राजाच्या हातात रिती करायला सुरुवात केली. राजाची ओंजळ शिगोशीग भरली; पण भिकारी थांबला नाही. धान्य ओघळून खाली गळू लागले.

सारी सभा विस्मयचकित झाली. आपण एखादे अद्‌भुत स्वप्न पाहत आहो असेच प्रत्येकाला वाटत होते.

रिकामी झालेली झोळी काखेला लावून भिकारी जायला निघाला. झपाझप पावले टाकत तो सभागृहाच्या प्रवेशद्वारापर्यंत गेला. साऱ्या लोकांचे डोळे त्याच्यावर खिळून राहिले.

कंपित स्वराने राजाने हाक मारली, "मित्रा."

भिकारी थांबला. मागे वळून तो राजाकडे पाहू लागला.

राजा उद्गारला, "मित्रा, तुला काय हवं ते तू सांगितलं नाहीस मला. माझी परतभेट न घेताच, माझा राजवाडा न पाहताच तू निघालास ?"

साऱ्या सभाजनांकडे एक कटाक्ष टाकत भिकारी परतला. तो पुन्हा सिंहासनासमोर येऊन उभा राहिला. सर्वांचे प्राण कानात गोळा झाले; पण भिकाऱ्याचे ओठ हालले नाहीत. त्याने काखेची झोळी काढली आणि राजाच्या उजव्या खांद्याला लावली.

सारी सभा भयभीत झाली. राजा एखाद्या पाषाणमूर्तीप्रमाणे स्तब्ध होता.

भिकारी राजाला म्हणाला, "महाराज, आपलं कुटुंब फार मोठं आहे. खाली पडलेल्या या धान्याचा त्याला थोडा ना थोडा उपयोग होईल. ते ठेवण्यासाठी ही झोळी मी मघाशीच आपल्याला द्यायला हवी होती; पण माणसाचं मन मोठं लोभी असतं. मी धान्य दिलं; पण झोळीचा मोह मला काही आवरता आला नाही."

भिकारी दिसेनासा होईपर्यंत सारे लोक त्याच्याकडे निश्चल दृष्टीने पाहत होते. तो दिसेनासा झाल्यावर त्यांनी राजाकडे पाहिले.

राजा सिंहासनावरून खाली उतरला होता. अश्रुपूर्ण नेत्रांनी गालिच्यावर पसरलेल्या धान्यांच्या कणांकडे पाहत होता. पाहता पाहता त्याने भक्तिभावाने आपले हात जोडले.

**लेखक - वि. स. खांडेकर**



मराठी
बालभारती : इ. ७ वी
दुसरी माला : १९८६



# ७. क्रांती

काँग्रेस पक्षाने शेवटी ८ ऑगस्ट रोजी ब्रिटिश शासनास अल्टमेटस देऊन टाकले. त्याच रात्री सर्व नेत्यांना अटक करण्यात आली. दुसऱ्या दिवशी 'शिवाजीपार्क' येथे जाहीर सभा होणार होती. त्या सभेत कस्तुरबा गांधी भाषण करणार होत्या. ती सायंकाळ मी कधीच विसरणार नाही. शिवाजी पार्कच्या परिसरास रणांगणाचे स्वरूप प्राप्त झाले होते. हे युद्ध युरोप खंडामध्ये सुरू असलेल्या युद्धापेक्षा कितीतरी भिन्न होते. एकीकडे लाखाच्या संख्येने आबालवृद्ध स्त्री-पुरूष होते, तर दुसरीकडे प्रबळ साम्राज्याची अफाट शक्ती होती. हजारोंच्या संख्येने शस्त्रास्त्रांनी सुसज्ज पोलीस, इंग्रजी व अँग्लो इंडियन अधिकारी होते. त्यांच्याकडे काठ्या, रायफली, बंदुका, रिव्हाल्व्हर, रणगाड्यावर चढवलेल्या मशीनगन्स, अश्रुगॅसचे बम आदी युद्ध सामुग्री होती. तासनूतास हे युद्ध सुरू होते.

काठ्यांचा वर्षाव झाला. रायफलींनी गोळ्या झाडल्या गेल्या. शेकडोच्या संख्येने अश्रुगॅसचे बम सोडले गेले. इतके की सर्वत्र विषारी ढग पसरले. डोळ्यांत मिरचीची पूड पडल्याने जशी आग होते, तशीच आग आणि सारखे वाहणारे अश्रू. माणूस काही काळासाठी दृष्टीहीन होऊन जातो. अशाही परिस्थितीत त्यांच्या उत्साहाला उधान आलेले होते. एक सत्याग्रही खाली पडला, की लगेच दुसरा तिरंगा हाती घेऊन पुढे सरसावत असे. स्वयंसेवक जखमींना लगेच उचलून घेऊन जाई आणि दुसरा त्याची जागा घेई. अश्रुधुरावरचा उपाय देखील कुणीतरी सुचवला. एक फडके पाण्यात भिजवून चेहऱ्यावर टाकले, की गॅस प्रभावहीन होतो. पाहता पाहता सर्व इमारतींतून सुगृहिणी बादल्यात पाणी घेऊन बाहेर पडल्या. निःशस्त्र शूरवीर नव्या जोमाने सज्ज झाले. पोलीस, फौजफाटा याला न जुमानता कोनाकोपऱ्यातून जाहीर सभा झाल्या. भाषणं झाली. स्वातंत्र्याचे ठराव संमत करण्यात आले. 'इन्कलाब जिन्दाबाद'च्या घोषणांनी सबंध वातावरण भरून गेले.

त्या सायंकाळी एक लाख मुंबईकरांनी अहिंसेशी एकनिष्ठ राहून बलाढ्य साम्राज्याचा सपशेल पराजय केला होता.

'स्वातंत्र्य-युद्ध' हे दोन शब्द अगदी लहानपणापासून ऐकत आलो होतो. कथा, कादंबरी आणि भाषणांत अनेकवेळा त्यांचा उच्चार केला होता; परंतु त्या सायंकाळी स्वत: डोळ्याने ते युद्ध पाहिले. सक्रीय भाग घेऊन प्रत्यक्ष अनुवले. अंगावर काठ्यांचे वार आणि सारखा अश्रुधूर यामुळे मी काही क्षण अंधळा झालो. हे पाहून कुणीतरी माझ्याकडे धावून आले. अनोळखी हातांनी माझे हात धरले. आधार देत देत मला एका घराच्या दुसऱ्या मजल्यावर घेऊन गेले आणि मराठी भाषेत काही तरी सांगून त्यांच्याकडे सुपूर्द केले. घरातील कोणत्या तरी व्यक्तीने मला हळूवार पलंगावर निजवले आणि डोळ्यांवर पाण्यात भिजवलेला रूमाल ठेवला. काही क्षणातच डोळ्यातली आग कमी झाली. मी रुमाल बाजूला सारला. सुरुवातीला अंधुक दिसलं; पण पुढील काही क्षणातच दृष्टी स्पष्ट झाली. भिंतीवर भगवान कृष्ण, लक्ष्मीदेवी आणि शिवाजी महाराज यांच्या प्रतिमा होत्या. एका कोपऱ्यात सुंदर मूर्ती होती. तिच्या समोर एक वयस्कर महिला फुलं आरती आदी ठेवून पूजा करत होती. अशा पवित्र पूजेच्या मंगलमय वातावरणात स्वत:ला पाहून अस्पृश्यतेच्या विचाराने मी थोडासा घाबरलो, कारण त्यावेळी स्पृश्य-अस्पृश्य असा भेद प्रखरतेने केला जात होता.

पलंगाची कुरकुर ऐकून त्या वयस्कर स्त्रीने वळून पाहिले. पूजा मध्येच सोडली. देवाला नमन केले, उठली आणि माझ्याजवळ येऊन ती मराठीत बोलली, उठलास कशाला, बेटा ! थोडा वेळ विश्रांती घे.''

मी म्हणालो, ''आता बरं वाटतंय, रात्र झाली. मला गेलं पाहिजे.''

''थांब, आधी दूध पिऊन घे.'' असे म्हणत ती आत गेली आणि पेल्यात गरम गरम दूध घेऊन आली.

मी ओशाळल्यासारखा झालो. अशा मायाळू बाईचा धर्म भ्रष्ट होईल, या विचाराने मी दुधाच्या ग्लासाला हात न लावता सांगितले,



''आई, मी मुसलमान आहे.'' मला वाटलं होतं हे ऐकून ती संभ्रमात पडेल. कशी वागणूक द्यावी याचा विचार करील; परंतु एका क्षणाचाही विलंब न लावता ती म्हणाली, 'तर काय झालं रे ? चल, दूध पी मुकाट्यानं.''

मी दूध पीत पीत म्हणालो, ''आई, क्षमा करा माझ्यामुळे तुम्हांला पूजा अर्धवट सोडावी लागली.''

''तर काय झालं, बेटा ! अरे हीदेखील एक पूजाच आहे.''

त्या अशिक्षित, अनोळखी वयस्कर मराठी बाईचं उत्तर ऐकून मी आश्चर्यचकित झालो. मी लगेच कोपऱ्यातील गांधीजींच्या प्रतिमेकडे पाहिले. त्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्न स्मित पसरलेले होते. ते स्मित जणू म्हणत होते,

''पाहिलस तू ? क्रांती अशीपण येते, सहज हळूवार हृदयाच्या मार्गाने.''

**लेखक - ख्वाजा अहमद अब्बास**

**मराठी अनुवाद - प्रा. अमानुल्ला खान**

●●●

उर्दू
बालभारती : इ. ७ वी
तिसरी माला : १९९५

# ८. आईची माया

मोनाने स्वत:ला सावरलं, तिला धीर आला असं वाटत होतं. चेहऱ्याचा खिन्न भाव कमी झाला होता. गेल्या काही रात्री ती स्वस्थ झोप घेत होती; पण न जाणो काय घडले त्या रात्री ! तिने परत ते भयानक स्वप्न पाहिले.

तिने पाहिले सकाळची सुंदर वेळ आहे, प्रसन्न वातावरणात तिचा एकुलता एक मुलगा पाच वर्षांचा ताहेर. त्याच्याच वयाचा त्याचा मित्र 'साजिद'बरोबर बागेत खेळतो आहे. ती स्वयंपाकगृहात नित्याच्या कामात गुंतलेली. एकाएकी तिच्या कानावर एक आरोळी ऐकायला आली. खिडकीतून डोकावून पाहिले नि तिच्या काळजात धस्स झाले. तिने पाहिले 'ताहेर' तिचा एकुलता एक मुलगा जांभळाच्या झाडाच्या एका फांदीला बिलगलेला आहे आणि मदतीसाठी दुसरा हात पसरलेला आहे. ती घाईघाईने बाहेर पडते आणि त्या झाडाकडे धाव घेते; परंतु तो पसरलेला हात धरण्याआधीच डोळ्याची पापणी लवते न लवते, तोच ताडकन आवाज करून ती फांदी तुटली. धब्ब असा आवाज झाला आणि ताहेर जमिनीवर आपटला गेला.

मोना किंचाळतच झोपेतून उठली आणि ओक्साबोक्शी रडू लागली. तिची झोप पार उडाली होती. हे काही नवीन नव्हतं. वारंवार घडत असे. सतत जागरण आणि सारखं रडणं याचा परिणाम तिच्या स्वास्थ्यावर होत होता. चेहऱ्यावरून ती वर्षानुवर्षे आजारी असल्यासारखी दिसत होती.

शाहीदने तिचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. प्रेमळपणे तो म्हणाला, ''असं काय डोक्यात राख घालून घेतेस, मोना ? स्वत:ला आवर, धीर धर. अगं असा वेडेपणा केल्याने गेलेला ताहेर काही परत मिळणार आहे का आपल्याला ?''

''ठाऊक आहे हो; पण त्या मेल्या साजिदमुळे माझा ताहेर गेला. तो नीच साजिदच या घटनेला जबाबदार आहे. त्यानेच फूस लावली आणि माझ्या बाळाला झाडावर चढायला सांगितले. तो खुनी आहे. त्याने माझ्या बाळाचा



जीव घेतला.'' असे म्हणत ती रडू लागली.

रात्रीच्या त्या नीरव क्षणांत कुठेतरी निर्जन कबरस्तानात एक व्यथित आत्मा विलाप करतो आहे, असे शाहीदला वाटले.

''अगं, पोराची वेळ आली आणि काळ त्याला घेऊन गेला. त्याची घटका भरली आणि तो संपला. त्यात साजिद बिचाऱ्याचा काय दोष ?''

शाहीदने मोनाची समजूत काढण्याचा प्रयत्न केला.

''मुळीच नाही. साजिदच या घटनेला सर्वस्वी जबाबदार आहे. तो शेजारी राहायला आला, तेव्हापासून त्याने पोराला वेडेवाकडे खेळ शिकवले. त्यानेच ताहेरला झाडावर चढण्यास सांगितले असेल. स्वत:देखील त्याच फांदीवर चढला. तो चढला नसता, तर ती फांदी तुटली नसती.

''अगं, ती फांदी अगदी कोरडी रूक्ष झाली होती. ती वाळलेली होती.''

''अहो माझ्या पोराचं ओझं तरी किती ? त्या दोघांच्या ओझ्याने ती फांदी तुटली. तोच. तोच माझ्या पोराचा वैरी आहे. गळा दाबून जीव घ्यावा त्याचा असं वाटतं. तो खुनी आहे.

''तुझं म्हणणं बरोबर नाही. साजिद कसला खुनी ?'' तो स्वत:च अभागा आहे. किती दु:ख भोगतो तो माहीत आहे ना तुला ? अगं एकाच रात्रीतून आईवडिलांच्या मायेला पारखा झालेला तो वंचित, अनाथ बाळ कसा खुनी होणार ?'' शाहीद म्हणाला, ''आजीने लाडावून ठेवला, म्हणून थोडा हट्टी आहे; पण उर्मट नाही. सर्वांचा आदर करतो. सर्वांशी प्रेम करतो. तो आपल्या जीवलग मित्राच्या मृत्यूला कारणीभूत होणारच नाही. अगं, आठवतं तुला तो राहायला आला, तेव्हा आपल्याला किती बरं वाटलं. आपल्या ताहेरचा एकाकीपणा संपला. त्याला चांगला सवंगडी मिळाला. या विचाराने आपण खूप आनंदी होतो. साजिददेखील किती प्रेम करायचा. तुझ्यावर, माझ्यावर, या घरावर. ताहेरवर तर अगदी जिवापाड प्रेम होते त्याचे.''

बोलता बोलता रात्र संपली. पहाटे पहाटे मोनाचा डोळा लागला. शाहीदला हायसं वाटलं. त्याने सुखाचा नि:श्वास सोडला आणि अंथरुणावर

अंग टाकले नि डोळे मिटले. डोळे मिटताच घटनाचक्र फिरू लागले.

साजिद आता मोनाला आई म्हणायचा ताहेरसारखा. एके दिवशी ताहेरने त्याला विचारले होते.

"बाबा, साजिद तुम्हांला बाबा म्हणू लागला, तर तुम्ही रागावणार नाही ना ?" शाहीदने हसून उत्तर दिले होते, "नाही, कधीच रागावणार नाही."

एका मागून एक घटना आठवू लागल्या. शाहीदची झोप उडाली.

अपघात घडल्यापासून साजिद फक्त एकदाच घरी आला होता. घरी येऊन तो पस्तावला असेल; कारण मोनाने त्या दिवशी सर्व राग त्याच्यावर काढला होता. अशी कान उघाडणी केली त्याची, की तो घाबरून पळाला. नंतर इकडे फिरकलासुद्धा नाही. बरेच दिवस तो दिसला नाही.... काय हाल झाले असतील त्या बिचाऱ्या साजिदचे....

एके दिवशी ऑफिसमधून परत आल्यावर शाहीद सहज ताहेरच्या खोलीत गेला. टेबलावर नवीन शालेय पुस्तकांचा गठ्ठा पाहून त्याला आठवलं, शाळा सुरू झाल्या होत्या. ग्रामर स्कूलमध्ये ताहेर आणि साजिद दोघांना प्रवेश घ्यावयाचा होता. नावाजलेली शाळा. शिफारशीशिवाय प्रवेश अशक्य. (सुदैवाने त्या शाळेच्या प्राचार्या मोनाची मैत्रीण होती. लंडनमध्ये त्या दोघी एकाच वर्गात शिकत होत्या. म्हणून दोन्ही पोरांना शाळेत प्रवेश मिळेल याची खात्री होती. पण आता परिस्थिती बदललेली होती.) शिफारशीशिवाय प्रवेश मिळणार नाही. बिचारा साजिद काय करणार. त्याची आजारी आजी अंथरुणावर खिळून पडलेली. एक म्हातारा नोकर होता. तो काय करणार. कुठे जाणार. फार फार झालं, तर जवळच्या शासकीय शाळेत कोंबणार नेऊन साजिदला. या विचाराने शाहीद व्यथित झाला.

एके दिवशी सकाळी मोना वर्तमानपत्र चाळत बसली होती. शाहीद ऑफिसला निघून गेला होता. वेळ जात नव्हता. ती खिडकीजवळ येऊन बसली. बाहेर रस्त्यावर लहान लहान बाळगोपाळ नवीन गणवेश घालून हातात टिफीन बॉक्स, खांद्यावर वॉटर बॅग इत्यादी घेऊन कुटुंबातील कोणातरी ज्येष्ठ सदस्याची बोटं धरून जात होते. "आनंदी आनंद गडे, इकडे



तिकडे चोहीकडे-" असं दृश्य होतं. मोनाला आठवलं आज शाळेत नाव नोंदणीचा शेवटचा दिवस होता. तिच्या काळजात चर्र झाले. तिच्या व्यथित मनात विचारांचा हलकल्लोळ माजला. ती कासावीस झाली. तो दिवसच अनिष्ट होता. तो दिवस, तो क्षण उगवला नसता, तर किती बरं झालं असत. तो नीच साजिद तिकडे राहायला आला नसता, तर ताहेर झाडावर चढलाच नसता आणि ती कोरडी वाळलेली फांदी आधीच कापून घेतली असती, तर ही वेळ आली नसती... साजिद ने तर काही दिवसापूर्वीच त्या वाळलेल्या फांदीबद्दल सूचना दिली होती; पण तिने दुर्लक्ष केले होते. तर... तर आपण स्वत: ताहेरच्या मृत्युला अप्रत्यक्षरीत्या कारणीभूत आहोत का ?

हा विचार मोनाच्या मनाला चाटून केला. ती अधिकच अस्वस्थ झाली. तिने आपले दोन्ही हात धडधडत्या छातीवर ठेवले. बरगड्या तोडून काळीज बाहेर पडेल की काय असे तिला वाटू लागले. ती घाबरून बाहेर व्हरांड्यात आली आणि आतुरतेने रस्त्याकडे पाहू लागली. पाहता पाहता तिची नजर एका मुलावर पडली आणि तिथेच खिळून राहिली. तिने निरखून पाहिले. तो साजिद होता. विषण्ण चेहरा. सर्व काही हरवल्याचा भाव. कुठे आणि कशासाठी चालला याचेही त्याला भान नव्हते.

काही क्षणातच देव जाणे काय घडले. साजिदचा एकाकीपणा पाहून मोना अस्वस्थ झाली. बैचेन होऊन ती बाहेर पडली आणि आपोआप तिचे पाय साजिदकडे वळले. तिला आपल्याकडे येताना पाहून साजिद थबकला. तो भांबावून गेला होता.

"इकडेच होतो." तो क्षीण आवाजात म्हणाला. त्यांच्या आवाजात जिवंतपणा नव्हता. साजिद यावेळी आईशी बोलला नाही याची मोनाला जाणीव झाली. "आता इथे काय करतोस ? शाळेत का जात नाही ? शाळेत नाव घातलं की नाही अजून ?" मोनाने विचारले.

साजिद स्तब्ध राहिला. तो खाली पाहत होता. ताहेरच्या आईच्या आवाजात मायेचा ओलावा आणि प्रेमळ भाव त्याला जाणवला होता. "अरे

पूर्वी तर तू माझ्याशी खूप खूप बोलत होता. आता असा गप्प का आहेस ? बोलत का नाहीस ?'' मोनाने विचारले.

''काल रात्रीपासून आजीची तब्येत अधिकच बिघडली. शाळेत एकट्या लहान मुलाला प्रवेश देत नाही. वडीलधारी माणसं बरोबर पाहिजेत,'' तो उत्तरला. त्याच्या बोलण्यात उदासीनता होती. त्याची निराशा मोनाला जाणवली. तिने त्याच्याकडे न्याहाळून पाहिले आणि त्याचा हात धरून म्हणाली, ''अरे वेड्या, काय ही दशा तुझी ? चल माझ्याबरोबर-'' साजिद भांबावून गेला होता. त्याचा विश्वासच बसेना; पण मोनाच्या चेहऱ्यावर मायेचा ओज पाहून तो तिच्याबरोबर घरात गेला.

मोनाने त्याचे तोंड हातपाय धुतले. कपाटातून ताहेरचे कपडे काढून त्याला घेतले. आरशासमोर बसवून मोठ्या आपुलकीने केस विंचरू लागली.

''काही फराळ घेतला की नाही ?'' लगेच तिने विचारले.

''नाही'' हे ऐकून ती म्हणाली,

''अरे वेड्या काही खाल्ले नाही, तर ताकत कुठून येईल हं ? आणि सैन्यात प्रवेश कसा मिळणार ? थांब आधी मी तुझ्यासाठी खायला काही आणते.''

असे म्हणत ती स्वयंपाक घरात शिरली. किती वाळला हा पोर या दोन महिन्यात ! असे विचार करत ती फराळ घेऊन टेबलाजवळ आली. आपल्या हाताने त्याच्या गळ्यात नॅपकीन बांधला. टोस्ट काढून त्यावर आपल्या हाताने लोणी आणि जाम लावला. भुकेला साजिद भराभर खाऊ लागला.

साजिदच्या सदऱ्याच्या खिशावर जांभळ्या रंगाचे डाग दिसत होते. ''अरे सज्जू, तुला जांभळे खूप आवडतात ? खिशात भरून ठेवतोस; पण ते डाग लवकर निघत नाहीत.''

ताहेरच्या आईच्या तोंडून 'सज्जू' हे ऐकून साजिदला खूप आनंद झाला. ताहेरलादेखील जांभळे खूप खूप आवडायची.

''हो मला माहीत आहे. जांभळे काढण्यासाठीच तो झाडावर चढला होता.'' साजिद म्हणाला.



''अरे पण, त्या कोरड्या फांदीवर कशाला चढला होता तो ?''

''नाही, नाही तो नव्हे. त्या कोरड्या फांदीवर मी चढलो होतो. ताहेरचा पाय हिरव्या फांदीवरून घसरला होता. त्याला धरण्यासाठी मी त्या वाळलेल्या फांदीवर चढलो होतो; परंतु मी तेथे पोहोचण्याआधीच तो खाली पडला. योगायोगाने त्याच वेळी ती वाळलेली फांदी तुटली आणि मीही खाली पडलो. फांदी फार उंच नव्हती; म्हणून मला किरकोळ मार लागला'' असे म्हणत साजिदने उजव्या हाताची बाही वर केली आणि खरचटलेल्या हाताचा कोपरा दाखवला. मोना स्तब्ध होती. खरंच तिने साजिदच्या पडण्याचा, त्याच्या जखमांचा विचारच केला नव्हता. मोनाला गप्प पाहून साजिद घाबरला. ती रागावते, की काय या विचाराने तो रडवेला होऊन म्हणाला,

''मी खरं सांगतो, आई माझ्यावर विश्वास ठेव. त्या कोरड्या फांदीवर मी होतो. मी ताहेरला मदत करण्यासाठी वर चढलो होतो. देवाशपथ मी निर्दोष आहे. मला तो खूप आवडायचा. मला त्याची सारखी आठवण येते. मला ताहेरचा विसर पडत नाही ग आई.''

हे सर्व ऐकून मोना आणखीनच स्तब्ध झाली. हृदयावरचे मोठे दडपण कमी झाले असे तिला वाटले. ताहेरचा मृत्यू अपघाती होता. ती विनाकारण या भोळ्या-भाबड्या साजिदला दोष देत राहिली.

''आई, माझ्यावर रागवू नकोस. देवाची शपथ घेऊन सांगतो. माझा काहीच अपराध नाही. मी काहीच केले नाही'' असे म्हणत साजिद ओक्साबोक्शी रडू लागला.

साजिदच्या तोंडून आई हे शब्द ऐकून मोनाला गहिवरून आले. तिने साजिदला छातीशी घट्ट कवटाळले आणि म्हणाली,

''बाळा, आता भिऊ नकोस, रडू नकोस. मला पटलं सारं. तुझा काहीच दोष नाही. जे घडलं ते आमच्या नशिबी होतं. चल, आता अश्रू पुसून घे. आपल्याला शाळेत जायचे आहे. थांब आधी मी तुझा डबा तयार करते, बाटलीत थंड पाणी भरते. मी तुला शाळेत घेऊन जाईन. मी घालीन तुझं नाव

शाळेत."

साजिदला रडू आवरत नव्हते. एवढी माया आणि जिव्हाळा जीवनात पहिल्यांदाच मिळाला होता. त्याचे अश्रू थांबत नव्हते. डोळ्यांतून जणू गंगा-यमुना वाहात होत्या.

मोना विचार करू लागली.

काय वेडा पोरगा आहे. अगदी माझा ताहेरच. त्याचा पसरलेला हात मी धरला तरी तो रडतोच आहे..

माझा ताहेरपण असाच भाबडा होता....

**लेखक - अन्वर इनायतुल्ला**
**मराठी अनुवाद - प्रा. अमानुल्ला खान**

●●●

उर्दू
बालभारती : इ. ८ वी
तिसरी माला : १९९६



# ९. विश्वास रुजवावा

आमच्या शाळेत एका संतांचे व्याख्यान होते. मी माझ्या वर्गातील मुलांना प्रार्थनामंदिरात वेळेवर घेऊन गेलो. तिथे सगळे आपापल्या जागेवर जाऊन बसले. मीपण व्यासपीठावर इतर शिक्षकांच्या रांगेत जाऊन बसलो.

थोड्या वेळात आचार्यश्री पाहुण्यांबरोबर आले. त्यांच्या सन्मानार्थ आम्ही सर्व उभे राहिलो.

व्यासपीठाच्या मध्यभागी दोन फूट उंचीचा लाकडी चौथरा होता. चौथऱ्याच्या मध्यात गादी आणि वर दोन मोठे गोल तक्ये ठेवलेले होते. पाहुण्यांबरोबर आचार्य गादीवर स्थानापन्न झाले, आम्ही सर्व बसलो. मग, आचार्यांनी उभे राहून पाहुण्यांची थोडक्यात ओळख करून दिली. ज्याचे सार एकाच ओळीत सांगायचे झाल्यास 'गुजरातमध्ये' आपल्या चारित्र्याचा सुवास पसरवणारे व संस्काराचा प्रसाद देणारे अमके.' त्यानंतर आचार्यांच्या विनंतीने संत उभे राहिले आणि बोलू लागले :

"प्रिय मुलांनो,

जेव्हा जेव्हा तुमच्यासारख्या मुलांसमोर बोलायची वेळ येते, तेव्हा तेव्हा माझ्या लहानपणीच्या एका प्रसंगाची मला आठवण येते.

त्यावेळी माझं वय अकरा-बारा वर्षांचे असेल. माझे वडील चांगले शिक्षणतज्ज्ञ होते. आम्ही मुंबईच्या एका उपनगरात राहात होतो. चार-पाच वर्षांची, नंदा नावाची बहीण होती. आम्हां दोघांना शेजारच्या उपनगरात बाबांच्या एका मित्राच्या संस्थेत शिकायला ठेवलं होतं. नंदाचे बालमंदिरपण माझ्या शाळेतच होतं; म्हणून मी आणि नंदा बसमधून बरोबरच जात असू व बरोबरच परत येत असू.

बसभाडे व खर्चासाठीचे पैसे आईच मला देत असे; परंतु त्या दिवशी आई बाहेरगावी गेल्यामुळे मी व नंदा खांद्याला दप्तर लावून बाबांजवळ पैसे मागायला गेलो. मी म्हटलं "बाबा, पैसे द्या."

"काय ?" असं म्हणत बाबांनी टेबलावर ठेवलेल्या एका मोठ्या पुस्तकातून वर बघितलं. चष्मा काढून डोळे चोळले. आमच्याकडे पाहिलं आणि हसून विचारलं :

"बोल, लेका काय आहे ?"

मी म्हटलं " द्या तीन आणे."

"कशाला ?" त्यांनी विचारलं

"कशाला ते ... दोन आणे माझ्या जाण्या-येण्याचे आणि एक आणा खाऊला."

"आणि नंदाला ?"

बाबांच्या ह्या अज्ञानाबद्दल मला हसू आलं.

"हा ... हा ... नंदाला का बरं ?"

"का ? तिला खाऊचे नाही; परंतु बसला तर लागणार ना ?" मला पुन्हा हसू आलं. नंदाला बालमंदिरकडून खाऊ मिळत असे हे बाबांना माहीत होतं, परंतु तिला बसभाडं लागत नाही हे त्यांना वर्ष होत आलं, तरी माहीत नव्हतं ! मी म्हणालो, "बाबा, तिला कुठे तिकीट लागते ?"

बाबांना वाटलं असेल - कायदा बदलला की काय ? आश्चर्याने ते म्हणाले, "का ? चार-साडेचार वर्षांच्या मुलाला अर्धे तिकीट नसते ?"

"अहो, पण कंडक्टर मागतच नाही ना !"

बाबांनी जवळच्या भिंतीवर लावलेल्या सदऱ्यामधून पाकीट काढताना सांगितलं,

"त्याने नाही मागितलं तरी आपण स्वत:हून घ्यायचं. त्याला काय माहीत, की हीचं वय तीन वर्षांपेक्षा जास्त आहे ?"

बसे चुकण्याच्या भीतीने, मी मुकाट्याने पाच आणे घेऊन खिशात ठेवले व नंदाला पुढे करून चालायला लागलो.

मी ठरवलं, की दोन दिवसांनी आई येईल, तेव्हा नंदाच्या तिकीटाचे पैसे मी तिला देईन व बाबांनी बळेबळे दिलेल्या पैशाची गोष्ट सांगेन; परंतु बसमधे बसल्यावर नंदाने आपली जीभ मोकळी सोडली आणि म्हणाली,



"दादा, माझं तिकीट मला दे बरं."

तिकीट देणारा कंडक्टर जवळ आल्यावर ती पुन्हा बोलली, "दादा, काढ ना आपल्या दोघांचं तिकीट.

मला तिचा भलताच राग आला ! परंतु बसमधे मी तिला दम दिला-" तर पितळ उघड पडेल. मी तिची समजूत घालत म्हणालो, "आता तू गुपचूप बसून राहा. खाली उतरल्यावर मी तुला ..."

मग कंडक्टरकडून माझ्या एकट्याचे तिकीट काढून, ते नंदाला दिले "घे हे ठेव तुझ्याजवळ."

"पण तुझे ?"

मी तिच्या कानात सांगितलं "सध्या चूप बस. मग खाली उतरल्यावर तुला गंमत सांगतो."

आणि नंदा बिचारी गप्प बसून राहिली.

खाली उतरल्यावर म्हणाली, "दादा, बाबांनी आपल्या दोघांची तिकीटं काढायला सांगितलेलं ना ?... मग तू एकच का काढलं ?"

"या उरलेल्या पैशातून आपण चॉकलेट घेऊ या" असं म्हणत मी तिची समजूत घालायचा प्रयत्न केला; पण नंदानी ऐकलं नाही. तिला चॉकलेटपेक्षा स्वत:च्या हातात तिकीट असावे आणि तेही स्वत:चे. या गोष्टीचंच जास्त महत्त्व होतं. शाळेच्या दरवाज्याजवळ आल्यावर तिला मी तात्पुरतं गप्प केलं, "ठीक आहे जाताना घेऊ या..."

जाताना पुन्हा नंदाने बसमधे बसल्याबरोबर तिने टकटक सुरू केली "दादा, काढ हं माझं तिकीट ...! मला दे बरं ..."

कंडक्टर जवळ आला, तेव्हा कानगोष्टी करतात तसे हळूहळू बोलत ती मला बोटाने टोचू लागली.

"घे. हं दादा, दादा, दोन घे हां !"

जेव्हा, मी एकच तिकीट काढलं, तेव्हा ती निराश होऊन इतकी रडवेली झाली होती, की फक्त अश्रू यायचेच उरले होते आणि यावेळी तर माझं

तिकीटपण तिने घेतलं नाही. मी तिच्या हातात दिलं, तर तिने ते माझ्या मांडीवर फेकलं.

आणि घरी पोहचल्याबरोबर ऑफिसातून नुकतेच आलेल्या बाबांजवळ तिने तक्रार केली, ''बाबा, माझं तिकीट दादाने काढलंच नाही.'' यावेळी तर तिच्या डोळ्यांत अश्रूदेखील आले !

बाबांनी प्रेमाने आम्हां दोघांना समोर बसवलं. मग आमच्याकडून संबंध गोष्ट ऐकून घेतली.

कशासाठी मी तिकीट काढलं नाही याचं कारण मी शोधून ठेवलेलं. मी म्हणालो, ''तिकीट काढलं असतं; पण आईने परत आल्यावर नंदाच्या तिकीटाचे पैसे दिले नाही तर ?''

बाबा म्हणाले, की ''माझ्या नीतीला काही अर्थ नाही ?'' त्यावर मी त्यांच्यापेक्षा अधिक शहाणा असावा अशा प्रकारचं दुसरं कारण सांगितलं, ''कंडक्टर जर मागत नाही, तर आपण पुढे होऊन कशाला पैसे द्यावे ? आईनेपण असंच सांगून ठेवलं आहे, की मागितले तर सांगावे, की उद्यापासून आणेन.''

बाबांनी माझ्या हुशारीची गोष्ट अजिबात ऐकलीच नाही. उलट त्यांनी मला लांबलचक उपदेश दिला. ज्याचे सार सांगावे असे, '-आपण बसमधून प्रवास करतो, तेव्हा कायद्यानुसार तीन वर्षे पूर्ण झालेल्या मुलांना अर्धे तिकीट काढावं लागतं. नाही काढलं तर ती चोरी झाली.''

खरं म्हटलं तर त्यावेळी बाबांचा तो उपदेश लक्ष देऊन ऐकण्याचं मी सोंग करत होतो.

दुसऱ्या दिवशी सकाळी तयार होऊन मी व नंदा बाबांकडे पैसे घ्यायला गेलो, तेव्हा बाबांनी केलेली एक लहानशी टिपणी, मेणात बाण रुतून बसतो, त्याप्रमाणे आजपर्यंत माझ्या अंतरात रुतून बसली आहे.

मी बसभाड्याकरिता पैसे मागितले, त्याबरोबरच नंदा बोलली, ''बाबा, माझे तिकिटाचे पैसे मला द्या.''



बाबा एकदम स्तब्ध होते. नंदावरून नजर फिरवून माझी कीव करत मला विचारलं,

''काय ? समजलं, बेटा ?''

मला काहीही समजलं नव्हतं; म्हणून बाबांकडे आणि नंदाकडे मी बघत राहिलो.

बाबांनी विचारलं, ''कशासाठी नंदा स्वत:च्या तिकिटाचे पैसे स्वत:जवळ ठेवायचा आग्रह धरते ?

मला समजलं आहे असे भासवत मी बोललो, ''होय बाबा...! तिला बसची तिकीटे खेळायला हवी म्हणून !'' बाबांनी नंदाकडे पाहिलं. नंदा लगेच बोलली, ''नाही बाबा, दादा माझे तिकीट काढणारच नाही म्हणून !''

बाबांनी माझ्याकडे पाहिलं व माझी कीव करत हसून म्हणाले, ''बघितलं ना बेटा ! नंदाला आता तुझा विश्वासच वाटत नाही !''

मी इतका शरमलो, की बाबांकडे पाहू शकलो नाही ! अलबत, या नंतर नंदाची समजूत घालून त्यांनी पैसे मला दिले; पण याबरोबर त्यांनी सांगितलेले वाक्य माझ्या अंतरात घर करून बसले. धीरगंभीर आवाजात बाबा म्हणाले होते,

''असे करत करत जगात, तू अविश्वासाचे बीज रुजवू नकोस बेटा.''

**लेखक : पन्नालाल पटेल**
**मराठी अनुवाद : उषाबेन शेठ**

●●●

गुजराती
बालभारती : इ. ७ वी
तिसरी माला : १९९५

# १०. पंडीत सुखलालजी

'सुखा ! शेठचा घोडा बांध'.

'सुखा ! शेठकरिता तांब्या पेला आण'.

'सुखा ! शेठचे अंथरूण घाल'

घरात आणखीन कोणीही नसावे, तसे वडील चौदा-पंधरा वर्षांच्या मुलाला हुकूम करीत असत. मुलालापण काम करण्याची इतकी हौस, की प्रत्येक काम धावत जाऊन पटकन करायचा. त्याचे काम पाहून घरी येणारे पाहुणे खुष व्हायचे. मुलगा अभ्यासात पहिला नंबर मिळवत असे व काम करण्यातपण पहिला नंबर. वडील मनात खुष व्हायचे, की माझा मुलगा मोठा व्यापार करेल. खूप कमवून तो लक्ष्मीला गुलाम बनवेल. व्यापारी पित्याचे यापेक्षा चांगले स्वप्न कुठचे असणार ? परंतु या सुखाला सोळाव्या वर्षी देवाने मृत्युच्या पंज्यात अडकवलं. त्याच्या रोमारोमातून देवीचे फोड उफाळून उठले. मुलाची वाचण्याची आशा नव्हती; पण मृत्युच्या शेवटच्या घटकेला सुख्याने यमदेवाचा पराभव केला. तो वाचला. तसे पाहिले तर यमदेवाला त्याने जिंकले होते आणि तरीही तो हरला होता. यमदेवाचा धंदाच क्रूर आहे. त्याच्या अंतरात दया कशी असणार ? सुख्याने आपला जीव घेऊ दिला नाही, तेव्हा त्याच्या डोळ्यांची दोन रत्ने घेऊन यमदेव संतोष पावला. सोळा वर्षांचा आशावादी सुखा अंधळा झाला ! सुख्याच्या अंतरात आग पेटत होती. यापेक्षा मृत्यू आला असता तर बरं ! पण मागितले म्हणून काय मरण येते ?

अंधळा दळतो किंवा गातो, अशी सुखलालची स्थिती झाली. तो गावात येणाऱ्या जैन साधूंच्या सानिध्यात राहू लागला. इतर साधू व फकीर यांच्याशीही सहवास साधला. तो अभ्यास करू शकत नव्हता व घरकामात त्याचा उपयोग नव्हता; म्हणून तो भक्ती करण्यासाठी आपला वेळ घालवत होता. समजशक्ती तीव्र होती, ग्रहणशक्तीपण सतेज होती. अंधळ्याच्या नशिबी पडेल तेवढे ज्ञान घेण्याचे त्याने चालू ठेवले. अंधळ्यासाठी



सामान्यत: सर्वांना सहानुभूती वाटते. त्यात सुखलालसारखा जिज्ञासू मुलगा असेल, तर साधुजनांना त्याच्याबद्दल माया वाटणार. त्याच्याशी बोलल्यावर, त्याने चांगलेच ज्ञान मिळवले आहे, अशी खात्री पटून त्याला जास्त ज्ञान द्यावे अशी सद्भावना होणारच.

सुखलालची ज्ञानपिपासा वाढतच चालली. मूल मोठे होते व आईचे दूध कमी पडते, तेव्हा दुसरे खाणे लागते. तसे सुखलालला गावात येणाऱ्या साधुसंतांच्या ज्ञानाने जी तृप्ती होत होती, ती आता वाटत नव्हती.

एके दिवशी त्याचा मित्र वर्तमानपत्र वाचत होता व सुखलाल ऐकत होता. मित्राने वाचले, "काही विद्यार्थी व साधू शास्त्रांच्या अभ्यासासाठी बनारसला गेले." ही बातमी ऐकून सुखलालला वाटले, आपणदेखील बनारसला गेलो तर ? मनात ज्ञानाची भूक प्रज्वलित होती, तेव्हा विचार करून त्याने मित्राला बनारसला पत्र लिहिण्यास सांगितले, 'एका अंधळ्या विद्यार्थ्याला शिक्षण घेण्याची इच्छा आहे.' पाहूतरी काय उत्तर देतात ?

मित्राला वाटले, की अंधळ्याला कोण होकार देणार ? परंतु सुखलालची प्रबळ जिज्ञासावृत्ती बघून त्याने पत्र घातले. अशा प्रकारची मागणी बनारस पाठशाळेत प्रथमच आली असणार. अंध विद्यार्थ्यांची उत्सुकता पाहून त्यांनाही होकार देण्याची प्रवृत्ती झाली असावी. उत्तर आले की त्यांना प्रवेश देण्यात येईल.

सुखलालला यापेक्षा विशेष काय हवे असणार ? त्याने बनारसला जाण्याचा दृढ संकल्प केला. घरची मंडळी याला सहमत होणार नाहीत असे समजून कुणाचाही सल्ला किंवा संमती घेण्याची औपचारिकता करण्यात त्याला शहाणपणा वाटला नाही. शेवटी निरोप घ्यायच्या दिवशी सगळ्यांना सांगावे असे ठरवले. त्याशिवाय सुटकापण नव्हती. अंधळ्या मुलाने ठरवलं, तरी तो गपचूप कसा जाणार ?

सुखलालने अगदी शेवटच्या दिवशी कुटुंबाला सांगितले, "हे पाहा, मी बनारसला जाणार आहे. जे कोणी खुष होऊन मला आशीर्वाद देणार असतील त्यांनी आशीर्वाद द्यावेत, नसेल त्यांनी गप्प राहावे; परंतु नाही म्हणून कोणीही

अपशकुन करू नये. जरी, अपशकुन केला, तरी मी जाणार हे नक्कीच !''

त्याच्या बोलण्याची जिद्द बघून नको म्हणून अपशकुन करण्याची कुणालाही हिंमत वाटली नाही. वडिलाने लेकाला बनारसपर्यंत पोचवण्याची सोय केली. एके दिवशी व्यापारासाठी निरोप देण्याची आशा धरलेल्या पित्याने मुलाला विद्या शिकण्यासाठी निरोप दिला. व्यापार करणारी मुले व्यापाऱ्याच्या घरी नेहमीच जन्म घेतात; परंतु विद्या मिळवणारे असे अंध सुखलाल जन्माला येणे हे दुर्मिळ आहे. सुखलालने व्यापार करून पैसे कमवले असतेच तर कुटुंबालाच ते लाभले असते; परंतु विद्या कमवल्याने अख्ख्या गुजरातला ते ज्ञान लाभणार होते.

बनारसला जाऊन सुखलालने श्री यशोविजय जैन संस्कृत पाठशाळेमध्ये प्रवेश घेतला. ते न्यायशास्त्रात पारंगत झाले. त्याने तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. वाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखेचा अभ्यास करण्याचा निग्रह केला. तरीसुद्धा बनारसमध्ये त्याची भूक तृप्त झाली नसावी; म्हणून अधिक शिक्षणासाठी मिथिला येथे गेले. तिथल्या पाठशाळेत ते गरम स्वेटर घालून बसले होते, त्यावेळी गुरुजींची नजर त्या स्वेटरकडे गेली. तो खूप आवडला असा त्यांनी भाव व्यक्त केला. गुरुजींना आवडलेले स्वेटर आपण कसे अंगावर ठेवावे ? त्याने ते गुरुजींना भेट म्हणून दिले; पण मग थंडी त्यांना थोडीच सोडणार ? मिथिलाच्या हिवाळ्याची कडाक्याची थंडी त्यांना रात्री हैराण करू लागली. जवळ इतर काही पांघरून नव्हतेच, म्हणून अंगावर गवत घालून एकमात्र फाटके कांबळे पांघरून थंडीशी मुकाबला करीत. मासिक दोन-तीन रुपयांच्या खर्चामध्ये जगणारे, नवीन स्वेटर लगेच कुठून घेणार ?

विद्येसाठी असे तप, त्याग व तितिक्षा (धीर) यामधून पार होऊन लहानपणीचा सुखा, तरुणपणातील सुखलाल जन्माने वणिक असून कर्माने पंडीत सुखलालजी म्हणून द्विज झाले. ते गुजराती विद्यापीठाच्या पुरातत्त्व विभागात भारतीय दर्शनशास्त्री (तत्त्ववेत्ता) म्हणून नेमले गेले. त्यानंतर बनारस हिंदु युनिव्हर्सिटीत जैन तत्त्वज्ञानाच्या अध्यापकाची धुरा सांभाळली.



कुणाचाही आश्रित न बनता ते स्वाश्रयी, मस्तफकीरासारखे जीवन जगले. त्यांची सेवा करण्यात लोकांना धन्यता वाटायची. त्यांच्याकडे शिकण्यात विद्यार्थ्यांना कृतार्थता वाटायची. त्यांच्या सहवासात आलेले लोक नुसत्या त्यांच्या स्मरणानेदेखील आनंदित व्हायचे.

त्यांनी चर्मचक्षू गमावले; पण त्यांचे ज्ञानचक्षू शाबूत राहिले, म्हणून ते संस्कृतचे विद्वान होऊनही अव्यवहारी झाले नाही. जन्माने ते जैन होते, जैन शास्त्राचे पंडीत देखील होते. तरीही सांप्रदायिक भिंतीमध्ये गुदमरले गेले नाहीत. भारतवर्षाचे ते महान तत्त्ववेत्त्यांपैकी एक म्हणून सर्वांच्या आदरास पात्र ठरले.

**लेखक - ईश्वर मोतीभाई पेटलीकर**
**मराठी अनुवाद - उषाबेन शेठ**

●●●

गुजराती
बालभारती : इ. ७ वी
दुसरी माला : १९८६

# ११. तो माणूस काही मामुली नव्हता

मनुष्यस्वभावाचं हे एक वैशिष्ट्यच असतं, की आपण एखाद्या मोठ्या शहरात काही कामांसाठी गेलो, तरी तिथली एखादी प्रसिद्ध वस्तू घरी घेऊन जावी असं वाटतं. ती वस्तू कुटुंबियांच्या हातात ठेवताना आनंद वाटतो. यातून त्यांची अपेक्षापूर्ती तर होतेच, शिवाय शेजारीपाजारी ती दाखवून मिरवून घ्यायची हौसही भागते.

असाच एकदा ऑफिसच्या कामासाठी मी लखनौला गेलो होतो. काम करता करता तिथल्या कोणत्या वस्तू प्रसिद्ध आहेत, हे विचारून घेतलं. कोणी कुर्ता-पायजमा सुचवला, तर कोणी कनोजी अत्तराची शिफारस केली. कपूरनी सांगितलं, ''इथल्या हातमागाच्या चादरी, चटया किंवा पडदे घेऊन जा. बारामुल्लात वस्त्रोद्योगाचे प्रदर्शन अनायासे चालूच आहे. तीस ते पस्तीस टक्के सूटही मिळेल.'' वर म्हणतो कसा, ''बहुत बढिया किसम के कपडे हैं, जरूर ले जाओ, क्या याद करोगे।''

कपूरचं म्हणणं मला पटलं. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी निघालो बारामुल्लाकडे.

एका भल्या मोठ्या इमारतीच्या आवारात प्रदर्शन भरलं होतं. ओसरीवर, व्हरांड्यात चारही बाजूंना रंगीबेरंगी वैविध्यपूर्ण बेडशीटस, साड्या, पडद्याचे कापड, ड्रेसमटेरियल्स, पायपुसणी, तांब्यापितळेच्या कलाकुसर केलेल्या वस्तू आकर्षक पद्धतीने मांडलेल्या होत्या. 'काय घेऊ नि काय नको' असं मला झालं. खिशाला परवडणाऱ्या आणि घरात लागणाऱ्या अशा वस्तू खरेदी करायला मी सुरुवात केली.

जवळजवळ दीड-दोन तास खरेदी चालली. घड्याळात पाहिलं, तर आठ वाजून गेले होते. एवढी सगळी पॅकेटस् घेऊन हॉटेलमध्ये जाण्यापेक्षा आधी गेस्टहाऊसवर जायचं ठरवलं. तिथे सगळ्या वस्तू ठेवून, अंघोळ करून मग जेवायला जावं, असा विचार केला. सात-आठ पॅकेटस्पैकी एखादं हॉटेलमध्ये



विसरलो तर ? उगीच जोखीम कशाला ?

बारामुल्लातल्या विशाल मैदानात जमलेल्या गर्दीतून वाट काढत काढत मी बाहेर आलो. तिथे रिक्षावाले गिऱ्हाइकांची वाट बघत उभेच होते.

त्याकाळी लखनौला सायकलरिक्षा असायच्या. आजूबाजूच्या गावातले किडकिडीत शेतमजूर इथे एक स्थिर उत्पन्न असावं म्हणून यायचे, सरकारी बँकांकडून सहज मिळणारं कर्ज काढायचे आणि मोकळ्या रस्त्यांवर सायकलरिक्षा ओढायचे. दहा-बारा तासांत वीस-बावीस सवाऱ्या मिळायच्या.

मी रिक्षा ठरवायच्या आधी मी विचारून घेतलं, ''पार्क लेन का कितना लोगे ?''

''सोच-समझके दे देना बाबूजी'' रिक्षावाल्याने उत्तर दिलं. या 'सोच-समझके'मध्ये मुक्कामाला पोचल्यावर नेहमीच घासाघीस असते, तरीही त्या रिक्षावाल्याच्या चेहऱ्याकडे बघून मी काही बोललो नाही.

बारामुल्लापासून पार्क स्ट्रीटपर्यंत साधारणपणे पाच रुपये होतात. मुक्कामाला पोचल्यानंतर मी त्याच्या हातात पाचाची नोट ठेवली. कोणताही वाद न घालता त्याने ती घेतली. त्याने पुढे आणखी पैसे मागू नयेत म्हणून भराभर सगळी पॅकेट्स उचलून मी गेस्टहाऊसचा जिना चढलो.

खोलीत गेल्यानंतर लक्षात आलं, की एक पॅकेट कमी आहे.

त्याचं असं झालं, की लखनौच्या सायकलरिक्षा असतात अरुंद, जेमतेम दोन व्यक्ती बसू शकतील अशा. पायाजवळ पॅकेट्स ठेवली, तर घरंगळून जायची शक्यता होती; म्हणून मी सात पॅकेट्स घेतली मांडीवर आणि एक लहान पॅकेट रिक्षाच्या मागच्या बाजूला फोल्डिंग शेडच्या मध्ये ठेवलं. त्यात मी बायकोसाठी घेतलेल्या दोन भारी साड्या होत्या. नेमकं तेच पॅकेट घ्यायचं मी घाईघाईत विसरून गेलो.

भरभर जिना उतरून खाली आलो; पण रिक्षावाला निघून गेला होता. लखनौ आणि तिथल्या झाडून सगळ्या रिक्षावाल्यांना मी मनातल्या मनात लाखोली वाहिली. ह्यांची दानतच वाईट ! त्या दोन साड्या मी अक्कलखाती जमा करून टाकल्या.

त्यानंतर माझा खरेदीचा हिशोब डायरीत लिहून झाला. बॅगेत सगळी पॅकेट्स रचून ठेवली. अंघोळीला गेलो. शॉवरच्या गार पाण्याने खरं तर माझा शीण उतरायला हवा होता; पण मनात साड्या गमावल्याचा राग होता ना ! अंघोळीचा आनंद घेणं शक्यच नव्हतं.

अंघोळ आटोपून तयार होत असतानाच गेस्टहाऊसच्या मुलाने दार ठोठावलं. खाली कोणी रिक्षावाला आला होता म्हणे ! काही वेळापूर्वी ज्यांना सोडलं होतं त्यांना भेटायचं होतं त्याला.

त्या दिवशी कंपनीच्या त्या चार बेडरूम असलेल्या अद्ययावत गेस्टहाऊसमध्ये मी एकटाच प्रवासी होतो; म्हणून मुलाने माझंच दार ठोठावलं. पळत पळत खाली गेलो. तोच रिक्षावाला दारात उभा होता. हातात मी खरेदी केलेल्या साड्यांचं पॅकेट होतं.

"आपने यह पॅकेट रिक्षा की पीछेवाली जगा में रखा था । जी. पी. ओ. से एक सवारी ली, तब उन्होंने मुझे बताया... उस भाईसाब को छोडके सीधा यहाँ आया । आप शायद हमारे बारे में कुछ सोचते होंगे, इसीलिए निझामपुर से सीधा यहाँ चला आया।"

मी खूष झालो. लखनौच्या रिक्षावाल्यांबद्दल मनात जे काही आलं होतं, ते आठवून शरमलो. त्याच्या हातात मी दहाची एक नोट ठेवली.

"यह किस लिये ?"

"खुशबक्षिस"

"अरे साब यह क्या बोले ? यह तो हमारा फर्झ था । हमारी रिक्षा में कोई भी चीज रह जाय तो मालिक को वापस करना हमारा फर्झ है ।"

"बरं, बक्षीस नको घेऊस; पण निझामपूरहून इथंपर्यंत रिकामी रिक्षा घेऊन आलास त्याचं भाडं समजू या. मग तर झालं ?" तरीही त्याने ते दहा रुपये घेतले नाहीत.

तो परत जात होता, तेवढ्यात मी म्हणालो, "एक मिनीट थांबा. मी वर जाऊन कुलूप लावून येतोच. मला जेवायला जायचं आहे. म्हणजे रिक्षा लागेलच.



"तो चलिये. मैं यहाँ ठहरता हूँ ।

वर जाऊन खोलीला कुलूप लावून लगेच खाली आलो.

रिक्षात बसल्यानंतर त्याने विचारले - "कहाँ जाना है ?"

"एखाद्या चांगल्या शाकाहारी हॉटेलमध्ये घेऊन चला. खूप महाग नको आणि स्वस्तही नको.

नंतर त्याने मला एका हॉटेलजवळ उतरवलं. "यहाँ बढिया खाना मिलेगा। आप बम्बईवालों के लिये यह होटल अच्छी रहेगी । पंजाबी, गुजराती खाना परोसते है यहाँ ।"

"शुक्रिया" मी म्हणालो आणि त्याच्या हातात पाच रुपये ठेवले. त्याने त्यातले तीन परत केले. "पार्क लेन से यह जगा बहोत नजदीक है । सिर्फ दोन रुपया किराये का होता है ।"

माझ्यासमोर एक असा प्रामाणिक माणूस उभा होता, की मी त्याला काही दिलं, तर तो घेतच नव्हता. गोड बोलणाऱ्या ह्या लखनवीसमोर मी क्षणाक्षणाला खुजा ठरत होतो.

"क्या नाम बताया आपने ?"

"रामशरण."

"अच्छा रामशरणजी आज ऐसा करें, आज साथ में खाना खायेंगे. मुझे खाने के वक्त आपकी कंपनी चाहिये ।"

"अरे अरे बाबूजी, ये क्या बोले ? हम ठहरे मामूली आदमी । इस होटल में आप के साथ खाना नहीं खा सकते ।"

"क्यों ?"

"कहाँ हमारा दीदार और कहाँ आपका ....."

त्याला जास्त काही बोलायची संधी न देता त्याचा हात धरून मी त्याला आत ओढतच नेलं. मेनूकार्ड वाचून छान छान पदार्थ मागवले; पण त्याने मात्र फक्त पंजाबी रोटी आणि दाल-फ्रायचीच ऑर्डर दिली. लोणचं सोडून दुसऱ्या कोणत्याही पदार्थाला त्याने हातसुद्धा लावला नाही. सलाड, पापड सर्वकाही माझ्यासाठीच ठेवलं.

जेवता जेवता मी त्याचं गाव, कुटुंब, मुलं-बाळं, धंदा इत्यादीबद्दल बरीच माहिती काढून घेतली. "ही रिक्षा चालवून तुम्हांला रोजची किती कमाई होते ?" मी विचारलं.

"आमचा धंदा सीझनवर असतो", तो म्हणाला. "हिवाळ्यात लोक पायी पायी जाणं पसंत करतात; पण उन्हाळ्यात आणि पावसाळ्यात बऱ्यापैकी भाडं मिळतं."

"आज सबंध दिवसात किती कमाई झाली ?"

"आजचा दिवस चांगला गेला. सकाळी एका लग्नाच्या पार्टीने तासावर रिक्षा अर्धा दिवस भाड्याने घेतली होती. बऱ्यापैकी पैसे मिळाले. शिवाय जेवण आणि वर बक्षिसी. अर्ध्या दिवसात अख्ख्या दिवसाचं कमवून घेतलं.

जेवण झाल्यानंतर बिल आलं. बिलाची रक्कम वाचून, हात धुवायचं निमित्त करून तो उभा राहिला आणि काऊंटरवर जाऊन बिल चुकतं करून आला. वेटर जेव्हा पैसे न घेताच 'पेड' चा शिक्का मारून बिल परत ठेवून गेला, तेव्हा ही गोष्ट माझ्या लक्षात आली.

"रामशरणजी, आपने ये अच्छा नहीं किया । खाने की दावत मैंने दी थी। काउन्टर पर जाके बिल क्यों पे किया ?"

"अरे साब, आप तो हमारे मेहमान ठहरे, क्या करें ? आज कल घर की हालत अच्छी नहीं है, वरना घर पर जाके आप को हमारा लखनवी खाना खिलाता । हमारे गाँव में तो मेहमानों की अच्छी तैनात करते हैं हम..."

"लेकिन ...." असं म्हणत मी त्याच्या हातात नोटा ठेवून बिलाचे पैसे परत घ्यायचा आग्रह केला. त्याने हातच मागे घेतला. मग मी त्याच्या खिशात जबरदस्तीने त्या नोटा कोंबल्या. तेही काम सोपे नव्हतेच.

हॉटेलच्या बाहेर येताच परत त्याने खिशातल्या नोटा बाहेर काढल्या आणि माझ्यासमोर धरून म्हणाला, "ये ठीक नहीं हुआ, बाबूजी । आपने हमारे साथ खाना खाया । कहाँ आप जैसे बड़े बाबू, और कहाँ मेरे जैसा



मामूली आदमी । बस, साथ में खाना खाया और दोस्तकी इज्जत बक्षी इतना काफी है मेरे लिये । आप ये पैसे वापस ले लीजिये ।

शेवटी त्याची खूप समजूत काढून, एकदाचे ते पैसे त्याला घ्यायला लावून, त्याच्याच रिक्षातून मी गेस्टहाऊसवर परत आलो. या वेळेस मात्र त्याने भाड्याचे पैसे घ्यायचं साफ नाकारलं. परत भेटायचं वचन देऊन, मजेत शीळ घालत तो निघून गेला. पॅडलवर पडणारे त्याचे पाय आजही माझ्या डोळ्यांसमोर येतात. फाटके कपडे, कृश देह, मळकट धोतर व फाटलेल्या बुटांमधून दिसणारी पायाची बोटं, तो मामुली माणूस नव्हताच मुळी. त्याचं मन विशाल आणि उदार होतं.

पुन्हा कधी लखनौला जायचा योग आला, तर या रामशरणला भेटायचं ठरवूनच मी लखनौ सोडलं.

**लेखक - गिरीश गणात्रा**
**मराठी अनुवाद - पद्माबेन मेहता**

●●●

गुजराती
बालभारती : इ. ८ वी
तिसरी माला : १९९६

# १२. उंदीर आणि मी

जे मी करू शकत नाही, ते माझ्या घरातला उंदीर करतो. जे या देशातल्या सामान्य माणसाला जमत नाही, ते ह्या उंदराने शक्य करून दाखवले आहे.

या घरात एक मोठा उंदीर आहे. मध्यंतरी काही कौटुंबिक कारणांमुळे आम्हांला बाहेरगावी जावे लागले; उंदराने काही झाले तरी मला याच घरात खायला मिळाले पाहिजे असा अधिकार आतापर्यंत माणसानेही मानला नाही, तो ह्या उंदराने मात्र मानला आहे.

जवळपास पंचेचाळीस दिवस घर बंद होते. मी पंचेचाळीस दिवसानंतर एकटाच घरी परतलो व दार उघडून पाहतो तर काय, उंदराने बऱ्याचशा काचेच्या व चिनीमातीच्या वस्तू खाली पाडून फोडून टाकल्या होत्या. मला वाटले होते, – 'उंदराने खाण्यासाठी खडबड केली असेल. डब्यात व बरण्यांत खाण्याचे पदार्थ शोधले असतील. खायला काहीच मिळाले नाही, तेव्हा तो शेजारी-पाजारी गेला असेल;' परंतु प्रत्यक्षात मात्र उंदराने हे आपलेच घर आहे असे ठरवून टाकले होते.

मी घरात जाऊन दिवा लावला, तेव्हा तो आनंदाने आवाज करत, इकडून तिकडे उड्या मारत, फिरत होता. कदाचित त्याला वाटले असेल, की घराचा मालक आला म्हणजे या घरात स्वयंपाक होईल, डबे उघडे राहतील आणि आपला खुराक आपणास मिळेल. दिवसभर तो आनंदाने संपूर्ण घरात हिंडत राहिला. त्याचा हा उल्हास मला खूप आवडला.

मी एकटा असल्याने घरात स्वयंपाक होत नव्हता. बहिणीचे घर जवळच होते. दुपारचे जेवण मी तिथेच करत असे. रात्री उशिराने जेवत असल्यामुळे बहीण डबा पाठवून देई. जेवण झाल्यावर मी डबा बंद करून ठेवत असे; त्यामुळे उंदीरमामा निराश होई. तो विचार करत असेल की 'हे कसले घर आहे ? माणूस आला आहे. दिवाही आहे; पण स्वयंपाक होत नाही. तो झाला असता, तर काही भाकरीचे तुकडे किंवा अन्नाचे कण मिळाले असते.'



मला एक नवीनच अनुभव आला. रात्री उंदीर पुन्हा पुन्हा येत असे आणि डोक्याकडील बाजूस मच्छरदाणीवर चढून वळवळ करत असे; त्यामुळे रात्रीतून कितीतरी वेळा माझी झोपमोड होई. मी त्याला हुसकावले, तरी परत थोड्या वेळाने येऊन डोक्याजवळ हालचाल करी.

तो उपाशी होता; पण त्याला डोक्याकडील बाजू आणि पायाकडील बाजू कशी कळली ? तो माझ्या पायाकडील बाजूस खुडबुड करत नसे. सरळ डोक्याकडील बाजूस येऊन खुडबुड करी.

एके दिवशी तो सरळ मच्छरदाणीतच घुसला. मी चांगलाच गडबडलो ! आता काय करावे ? याला मारले आणि तो कोण्या कपाटाखाली जाऊन मेला, तर तेथेच सडेल आणि साऱ्या घरात दुर्गंधी सुटेल.

अशा प्रकारे उंदीर रात्री मला त्रास देत असे. मला झोप येई, पण पुन्हा पुन्हा तो उशाजवळ येऊन खडबड करत असे.

शेवटी एक दिवस माझ्या लक्षात आले, की उंदराला काहीतरी खायला पाहिजे. त्याने या घराला आपले घर मानले आहे. तो आपल्या हक्कांबाबत जागरूक आहे. तो रात्री माझ्या उशाशी येऊन जणू म्हणत असावा - 'का रे, तू आला आहेस. पोटभर जेवत आहेस आणि मी इथे उपाशी मरत आहे ना ! मी या घरातील सदस्य आहे. माझाही अधिकारी आहे. मी तुझी झोप उडवून टाकीन.'

शेवटी मी विचार करून त्याची ही मागणी पूर्ण करण्याचा एक उपाय शोधला.

रात्री जेवतेवेळी पापडाचे काही तुकडे मी आजूबाजूस टाकले. उंदीर कोठून तरी आला नि कपाटाखाली जाऊन ते तुकडे खाऊ लागला. जेवण झाल्यावर परत मी भाकरीचे काही तुकडे जमिनीवर विखरून टाकले. सकाळी बघितले, तेव्हा त्याने ते सर्व खाल्ल्याचे दिसून आले.

एके दिवशी बहिणीने तांदळाचे पापड पाठवले. त्याचे तीन-चार तुकडे मी जमिनीवर टाकले. उंदीर आला नि त्यांना हुंगून परतला. जणू त्याला तांदळाचे

पापड पसंत नव्हते. मला उंदराच्या त्या आवडी-निवडीचे नवल वाटले. नंतर मी भाकरीचे काही तुकडे टाकले. तो ते एक एक करून नेऊ लागला.

आता ते रोजचेच काम झाले. मी डबा उघडताच उंदीर येऊन पाहात असे. मी एक-दोन तुकडे टाकताच ते तो घेऊन जाई; पण एवढ्याने त्याची भूक भागत नव्हती. जेवणानंतर मी बरेचसे तुकडे जमिनीवर टाकत असे. रात्री ते खाऊन तो झोपी जाई. इकडे मीही आरामात झोपत असे. आता तो माझ्या उशाशी कसलीही खुडबुड करत नसे.

मग एकदा त्याने कोठून तरी आपल्या जातभाईस आणले. म्हणाला असेल, ''अरे, चल माझ्याबरोबर त्या घरात. मी त्या घरवाल्यास सतावून, भिववून, जेवण प्राप्त केले आहे. चल, दोघेही खाऊत. त्याचा बाप आपणास खाऊ घालेल. अन्यथा आपण त्याची झोप उडवून देऊ. तो आमचा अधिकार आहे.''

आता दोन्ही उंदीर मजेत खात आहेत. मी विचार करतोय, की काय माणूस या उंदरांपेक्षाही निकृष्ट आहे ? आपल्या खाण्याच्या हक्कासाठी उंदीर माझ्या डोक्यावर चढतो, मला स्वस्थ झोप घेऊ देत नाही.

देशातील माणूस उंदरासारखा केव्हा वागू लागेल ?

लेखक - हरीशंकर परसाई
मराठी अनुवाद - डॉ. अलका पोतदार

●●●

हिंदी
बालभारती : इ. ७ वी
दुसरी माला : १९८६



# १३. 'पाया : स्वातंत्र्याचा'

राणी लक्ष्मीबाईंच्या ध्यानात आले, की आपण स्वतंत्र असूनही ग्वाल्हेरमध्ये झाशीच्या किल्ल्यांत आपली स्थिती एखादया कैद्यासारखी आहे. राणी जिथे जात, तिथे त्या जागेचं, परिसराचं त्या बारकाईनं निरीक्षण करत, तो जणू त्यांचा स्वभावच बनला होता.

राणीचे परिसरनिरीक्षण चालू असताना त्यांना सोनरेखा ओढ्याच्या उत्तरेला थोड्या अंतरावर बाबू गंगादास याची झोपडी दिसली. लाकूड आणि गवताचा उपयोग करून गंगारामची ही झोपडी तयार झाली होती. राणी लक्ष्मीबाई तहान लागल्याने त्या झोपडीजवळ गेल्या. बाबाने त्यांना पाणी दिले. त्याच वेळी गंगादासना कळलं, की त्या झाशीच्या राणी आहेत. त्या दिवशी बाबा गंगादासच्या डोळ्यांत अद्‌भूत अशा शांतीचं दर्शन राणी लक्ष्मीला घडले.

तिथून परतल्यावर त्यांची नेहमीची कामे चालू होती. तळाचे निरीक्षण, लढाईचे नकाशे, सैनिकांची कवायत, संचलन, पूजाअर्चा त्या करत होत्या; पण त्यांचे लक्ष कुठेच लागत नव्हते.

सायंकाळ व्हायला थोडासा वेळ होता, गरम हवा वाहत होती, मुंदरबरोबर राणी लक्ष्मीबाई बाबा गंगादासच्या झोपडीवर आल्या. बाबांनी दोघांना प्रणाम करून त्यांना बसायला आसन दिले. प्यायला थंड पाणी दिले.

राणी लक्ष्मीबाई म्हणाल्या, ''मी आपल्याला काही विचारायला आले आहे. माझं चित्त कुठंच लागत नाही. तुमच्या उपदेशानं मनाला थोडं बरं वाटेल अशी आशा धरून आले आहे.''

बाबा गंगादास म्हणाले, ''रामाच्या भजनाशिवाय माझ्याकडं तुम्हांला सांगायला दुसरं काय आहे ?''

''तेवढ्यासाठी तर मी तुमच्याकडं आले. आपल्याला मला उपदेश द्यावाच लागेल. आपण आता वेळ लावू नका. आपल्या एकट्याच्या मनाला

शांती मिळते, मग इतरांच्या मनालाही ती मिळावी असं आपल्याला वाटत नाही का ?'' राणी लक्ष्मीबाई म्हणाल्या. यानंतर त्यांचा संवाद सुरू झाला.

बाबा : सांग मुली, तुझ्या मनाच्या दु:खाची कहाणी सांग. काही सुचलं, समजलं तर अवश्य उपाय सुचवीन.

राणी : आता थोड्या दिवसांत इथे युद्धाला सुरुवात होईल. आपल्या झोपडीला या लढाईमुळे धोका आहे. आपण कुठंतरी सुरक्षित जागी जावे.

बाबा : माझी झोपडी सुरक्षित आहे. काळजी नसावी. तुझ्या मनात काय असेल ते विचार.

राणी : या देशाला स्वराज्य कधी मिळेल, याची मला चिंता आहे.

बाबा : या प्रश्नाचं उत्तर तर राजे लोकच देऊ शकतील.

राणी : तसं होत नाही, म्हणून तर तुमच्याकडे आले.

बाबा : आतापर्यंत अशा गोष्टी जशा मिळाल्या तशाच मिळतील.

राणी : म्हणजे कशा मिळतील बाबा ?

बाबा : सेवा, तपस्या आणि बलिदानामुळे.

राणी : आम्ही स्वराज्याची स्थापना कशी करू ?

बाबा : पाया कसा भरला जातो ? प्रथम एक दगड रचला जातो, मग दुसरा, मग तिसरा. या पद्धतीनं तर शेवटी इमारत उभी राहते. त्यातील पहिला पायाचा दगड कुणाला दिसत नाही; पण इमारत उभी राहते ती त्यावरच. इमारतीचा पाया एका दगडाने आणि एका दिवसात तयार होत नाही. त्यासाठी अविरत प्रयत्नाची आणि बलिदानाची आवश्यकता आहे.

राणी : स्वराज्य स्थापन झालेले आम्हांला पाहायला मिळेल ?

बाबा : मुली, हा मोह का ? कुणीतरी सुरू केलेलं काम तू पुढं चालू ठेवलं आहेस. अजून माणसं येतील. ते तुझं काम पुढं नेतील. स्वराज्य स्थापन करू इच्छिणारे आदर्शवादी राजेलोकदेखील छोटे छोटे राज्य वसवण्यात तृप्ती मानतात. ते आणि सामान्य जनता



यांच्यातील अंतर जोपर्यंत मिटत नाही, तोपर्यंत हे असंच चालू राहणार. छोट्या-छोट्या कारणांनी प्रजा त्रस्त झालेली दिसते. जोपर्यंत राजेलोक स्वत:चा वैयक्तिक विलास आणि डामडौल विसरून जनतेचे सेवक होत नाहीत, तोपर्यंत जनतेचा खरा सहयोग लाभत नाही. हा सामान्य प्रजेचा सहयोग राजाला मिळाला, की समजावं आता पायाचं काम पूर्ण होऊन इमारतीच्या बांधकामाला सुरुवात झाली आहे.

राणी : मग आम्ही प्रयत्न सुरू करावा तर !

बाबा : अवश्य, तू तर भगवान कृष्णाची आणि गीतेची भक्त आहेस ना ?

राणी : तुम्हांला कसं कळलं ?

बाबा : सगळे लोक असं सांगतात म्हणून.

राणी : मी फक्त गीतेचे पठन करते. अर्थ आपल्यासारख्या महात्म्यांनाच ठाऊक असतो.

बाबा : मुली, लक्षात ठेव. गृहस्थाश्रम आचरणाऱ्या गृहस्थाशिवाय दुसरा कोणताही साधू नाही. माझ्यानं दुसरं काही घडलं, घडवलं नाही; म्हणून मी झोपडी बांधून बसलोय.

येवढं बोलणं होईपर्यंत सूर्यास्ताची वेळ जवळ आली. राणीला संध्याकाळच्या स्नानसंध्येची आठवण झाली. त्या म्हणाल्या, ''आनंद झाला. परत आपल्या दर्शनाला येईन. आपल्या बोलण्यातून मन शांत झाले.'' बाबांना नमस्कार करून त्या बाहेर पडल्या. वाटेत मुंदर म्हणाल्या, ''बाबांनी सांगितलेल्या गोष्टी तुम्ही तर नेहमीच सांगता.''

राणी लक्ष्मीबाई म्हणाल्या, ''परंतु बाबांच्या म्हणण्याप्रमाणं स्वराज्य मिळायला अजून वेळ आहे.''

**लेखक- वृंदावनलाल वर्मा**

**मराठी अनुवाद -सुधाकर प्रभू**

●●●

हिंदी
बालभारती : इ. ८ वी
तिसरी माला : १९९६

# १४. चोरांचा गुरू

"आपलं घर लुटलं जाऊन आठवडा झाला. चोरांनी घरात एक पैसा, दाणाही शिल्लक ठेवला नाही. गावाबाहेरचं हे घर नको, म्हणून मी दाताच्या कण्या केल्या; पण तुम्ही त्यावेळी ऐकलं नाही."

"जाऊ दे ग, रत्ना ! आपल्याजवळ काहीच नसतं, तर त्यांनी काय नेलं असतं ? पैसा-अडका, दाग-दागिने जमवू नकोस असं म्हटलं, तर तू ऐकलं नाहीस. आमचं हे वैद्यकीय ज्ञान पैसा कमवण्यासाठी नाही, समाजाच्या सेवेसाठी आहे. आपल्याला जगण्यापुरतं थोडंफार समाजाकडून मिळालं की झालं."

"काय डोंबलं मिळणार समाजाकडून ? चोरी झालेल्या दिवसापासून एका पैशाची मिळकत नाही. माझ्या माहेराहून मिळालेले माझे सोन्याचे दागिनेही गेले. सगळंच लुटलं गेलं. आता जगायचं कसं ?"

"सगळं कुठं लुटलं गेलं, रत्ना ? औषधांच्या बाटल्यांना चोरांनी हात लावला नाही. माझं वैद्यकीय प्राविण्य तर कोणीच चोरू शकत नाही."

"कसलं प्राविण्य कोण जाणे ! उद्याच्या दुपारच्या जेवणाची ददात आहे."

ढण्.. ढण.. दूरच्या घड्याळातून दहाचे ठोके ऐकू आले. वैद्यांचा बाहेरचा दरवाजा लावलेला होता. आतल्या छोट्या खोलीत वैद्य व त्यांची बायको बोलत बसले होते.

कृष्णपक्षातील चतुर्दशीची रात्र होती. घराला चहूबाजूंनी अंधाराने घेरले होते. एकाएकी वैद्यांना बाहेरून हाक ऐकू आली.

"मालक .. ओ .. मालक .."

वैद्यांनी चटकन बाहेर येऊन दार उघडले. अंधारात मशाल हातात धरून दोघे उभे होते. दोघेही काळे व धिप्पाड होते. डोक्यावर वाढलेले केस अस्ताव्यस्त पसरलेले, विजार घातलेली, अंगावर काळी घोंगडी घेतलेली.



वैद्य त्यांच्याकडे क्षणभर पाहून म्हणाले, "आज तुम्हांला इथं काहीही मिळणार नाही. आठवड्यापूर्वीच सारं चोरीला जाऊन घर रिकामं झालंय. मूठभर धान्यसुद्धा घरात नाहीये !"

आलेल्यांपैकी एकजण म्हणाला, "आम्ही चोरी करायला आलो नाही, मालक, औषधासाठी आलोय."

"औषधासाठी ? कुणासाठी औषध ?" वैद्यांनी चौकशी केली.

"आमच्या धन्याच्या मुलासाठी मालक ! त्यांना एकुलता एक मुलगा आहे. चारपाच दिवसांपासून तापलाय. आज तर तो नुसता तळमळतोय. कसंही करून तुम्हांला घेऊन यायचंच असं आमच्या धन्यानी बजावलंय. म्हणून पळत पळत तुमच्याकडे आलोय. आपण चलाव, मालक." त्यातला एक विनवणीच्या सुरात म्हणाला,

"कोण तुमचा धनी ?"

"पारधींगावचा भीमनायक !"

म्हणजे.. तो चोरांचा गुरू ?" वैद्यांनी अचंब्याच्या सुरात विचारले.

चाचरत एकजण बोलू लागला, "होय मालक, तो चोरांचा गुरू आहे खरा; पण आता तुम्ही यायलाच हवं. त्याला तेवढा एकच मुलगा आहे. तो त्याला जीव की प्राण आहे."

वैद्यांनी क्षणभर विचार केला. मग 'आता येतो, जरा थांबा' असे सांगून आत गेले. निघायची तयारी केली. बायकोला दार नीट लावून घ्यायला सांगितलं आणि बाहेर येऊन म्हणाले, "कुठं जायचंय ? चला."

गर्द अंधारी रात्र. जंगलातील वाट. यमदूतासारख्या भासणाऱ्या त्या दोघांनी धरलेल्या मशालीच्या उजेडात वैद्य चालत राहिले. वैद्यांच्या मनात विचित्र विचार येत होते. 'हे लोक आपल्याला फसवणार तर नाहीत ना ? नको म्हटलं तरी पोलिसांनी आपल्या घरातील चोरीचा तपास चालूच ठेवला आहे. त्यामुळे यांचा मला मारायचा तर विचार नाही ना ? तसं झालं तर रत्नाचं काय होणार ?

''ओ... मालक साप, साप..'' त्यातला एक ओरडला. वैद्य दचकून जागे झाल्यासारखे झाले. ते पाहतात तर दोन हात अंतरावर एक नाग आपला लांबलचक देह सरकवत पुढे जात होता. तिघेही बाजूला होऊन त्याच्याकडे पाहात राहिले. नाग निघून गेला. तिघेही पुढे चालू लागले.

पुन्हा वैद्य विचार करू लागले. 'सापासारखा प्राणीसुद्धा छेड काढली तरच चावतो; पण माणूस ? त्याची तऱ्हा वेगळीच ! छेड काढली नाही, तरी सर्वांना चावणार ! चोरापासून सम्राटापर्यंत सर्वांना संपत्तीचा लोभ आहेच ! मग माझ्या रत्नालाच का आपल्या दागदागिन्यांचा लोभ नसावा ? ती पण या जगातल्या माणसांपैकीच एक आहे ! माझ्या रत्नाला मी तरी परत मिळतो की नाही कोणास ठाऊक ?'

जंगलातील पायवाट संपून तिघेही एका छोट्या खेड्यात आले. कुत्री भुंकायला लागली. वैद्यांची छाती धडधडायला लागली. चालताना पाय थरथरत होते. तिघेही एका घरासमोर आले. घरात पाऊल ठेवायचा अवकाश, एक अक्राळ-विक्राळ माणूस समोर आला. वैद्यांच्या अंगावर शहारे आले. वैद्यांचे पाय घट्ट पकडून तो म्हणाला, ''अगदी देवासारखे आलात. दया करा, अन् माझ्या मुलाला वाचवा.''

वैद्यांनी त्याचे हात पकडून त्याला वर उभे केले. त्यांना त्या अक्राळ-विक्राळ चेहऱ्यावरचा दीनपणा जाणवला. तसेच त्याचे हात पकडून मुलाच्या खोलीत गेले. मिणमिणत्या मंद प्रकाशात अंथरुणात तळमळणारा जीव पाहिला. शेजारी बसलेली मुलाची आई हुंदके देत रडत होती.

वैद्यांनी मुलाची नाडीपरीक्षा केली. 'घाबरू नका' असा आईवडिलांना धीर देऊन त्यांनी मुलाला औषध पाजले. चारपाच मिनिटात तो मुलगा डोळे मिटून झोपला.

तीनचार मिनिटे शांततेत गेली. ''आजचा दिवस असाच गेला असता, तर तुमचा मुलगा तुमच्या हाती लागला नसता. देवाने मलाही बुद्धी दिली. मी आलो. भीमण्णा, रक्षण करणं हे देवाचं काम आहे, मारणं हे राक्षसाचं काम आहे. रक्षण करण्याचे काम मनापासून करणाऱ्याच्या पाठीशी देव असतो !''

रक्षण करणं हे देवाचं काम .. मारणं हे राक्षसाचं काम' हे शब्द भीमनायकाच्या मनाला भिडले. त्याच्या मनात प्रश्न उभा राहिला. 'मी रक्षण करण्याचं काय काम केलं आहे ? काही नाही. मग देव मला काय मदत करणार ?'

तेवढ्यात मुलगा जागा झाला. हलक्या आवाजात त्याने 'अप्पा' अशी हाक मारली. आई-वडिलांनी, त्याला अतिशय आनंदाने मिठी मारली. मुलाचे डोळे लख्ख उघडले. त्याचे अंग घामाने डबडबले, ''बाळाला घाम आलाय'' आई थरथरत्या आवाजात म्हणाली.

देव दयाळू आहे. तो कोणाचं वाईट करत नाही.'' वैद्य समाधानाने गहिवरलेल्या आवाजात म्हणाले.

पुन्हा एकदा औषध पाजेपर्यंत कोंबडा आरवायची वेळ झाली. ''बाई, हा घ्या तुमचा मुलगा. आता घाबरायचे कारण नाही.'' वैद्य असे सांगताना मुलाचे आईवडील त्यांच्याकडे कृतज्ञतापूर्वक नजरेने पाहात होते. वैद्यांना ते अक्राळ-विक्राळ आकाराचे पारधी न वाटता साधी माणसे वाटली. उजाडल्यानंतर वैद्य आपल्या घरी निघाले. भीमनायक त्यांच्या पाया पडला. ''तो न दिसणारा देव; तुम्ही मात्र मला दिसणारे देव आहात. तुमचे उपकार मी कधीही विसरणार नाही.''

----- ****** -----

दुसऱ्या दिवशी अमावस्येची काळीकुट्ट रात्र होती. रात्रीचे दहा वाजले होते. घराचा पुढचा दरवाजा उघडाच होता. पुढच्याच खोलीत नवरा-बायको बोलत बसली होती. बायको म्हणाली, ''तुमच्या वैद्यकीय प्राविण्याला मिळालेली फळं लक्षात आली बरं का .. पायभर टोचलेले काटे .. पायाला लागलेली ठेच .. झोपमोड.... उपासमार !''

''असं का बोलतेस, रत्ना ? माझ्या वैद्यकीय प्राविण्याने एका आईला आनंद दिला .. एका वडिलांचा वंश वाढला. ते जाऊ दे .. आज

औषधासाठी त्यांच्यापैकी कोणीही आलं नाही. एवढ्यात येऊन जायला हवे होते.''

वैद्य बोलत असतानाच आदल्या दिवशी बोलवायला आलेले पारधी डोक्यावर गाठोडी वाहून आत आले. त्यांच्या पाठोपाठ भीमनायकही आत शिरला. येता येताच वैद्यांना नमस्कार करत तो म्हणाला, ''देवाचे दागिने अन् वस्तू देवाला अर्पण करायला आलोय. मालक, मला क्षमा करा. दया करून हे सारं घ्या.''

दोघांनी ती गाठोडी उघडून ठेवली. वैद्यांच्या घरी चोरी झालेल्या सर्व वस्तू त्यात होत्या.

भीमनायक पुन्हा बोलू लागला. ''आपलं अंथरुण माझ्या मुलाच्या शेजारी आहे. तेवढं मात्र आणलं नाही. आपले आशीर्वाद म्हणून ते माझ्या मुलासाठी राहू दे. मालक..''

नवरा-बायकोच्या तोंडून शब्द,फुटेना. भरून आलेल्या अंत:करणाने वैद्य आपल्या बायकोकडे पाहात होते. बायको आश्चर्य भरलेल्या डोळ्यांनी एकदा वैद्यांकडे, एकदा भीमनायकाकडे पाहात होती. तिच्या चेहऱ्यावर समाधानाचे मंद हास्य उमलले होते.

**लेखक - बेटगेरी कृष्णशर्मा**
**अनुवाद - मीना वांगीकर**



कन्नड
बालभारती : इयत्ता ७ वी
दुसरी माला : १९८६



# १५. नंदादीप

''दोन्कल.... दोन्कल.''

वृत्तपत्र वाचण्यात गढलेला मी, कंडक्टरच्या आरोळीने भानावर आलो. चौफेर नजर फिरवली. मला दोन्कल इथंच उतरायचं होतं.

लगेच मी एअरबॅग खांद्याला अडकवली आणि खाली उतरलो.

धूळ उडवित बस निघून गेली.

दगडी कट्ट्यावर, झाडांच्या सावल्यात, इकडे तिकडे प्रवासी बसलेले होते.

''करीमनगरहून आत्ताच का येतोयस ?'' आजोबानं विचारलं.

''होय आजोबा. बरं आहे ना सारं ? कुठं चाललात ?''

''कुम्मरपल्लीच्या काकूंकडं चाललोय. आताच आर्मूर बसनं आलोय'' रामय्या आजोबा म्हणाले.

''कितीही घाई केली तरी, उशीर झालाच. वाल्गोट-एल्कटूरची बस शेवटी चुकलीच तर ?'' मी.

''नाही रे पोरा, आज ती दीडतास उशीरानं गेली. साडेतीन वाजता इथून अम्मूरची बस हलली. तिथून पिप्पेराची ट्रीप करून तिला इकडं परतायला कदाचित सहा वाजतील !''

मी उभ्या उभ्याच उन्मळलो.

''खेड्या खेड्याला बस सेवा'' अशी आपल्या शासनाची नुसती घोषणाच असते. अजूनही कित्येक खेड्यांतून बस दोन, तीन वेळाच धावते.

शासकीय दप्तरी 'दोन्कल' म्हणून नोंद झालेलं गाव दोनुगंटि ....... निजामाबाद, करीमनगर या हमरस्त्यावर आहे.

प्रत्यक्ष गाव..... बस स्थानकापासून सुमारे एक किलोमीटर अंतरावर. तिथून नऊ किलोमीटर अंतरावर असणारे 'रेंजर्ला' हे माझें गाव !

अर्मूर, एल्कटूर मार्गावरील दोन्कल रूटवर माझं रेंजर्ला गाव. पदवी घेऊन

पाच वर्षे आणि टीचर ट्रेनिंगनंतर तीन वर्षे लोटल्यानंतर करीमनगर येथे माझी शिक्षक म्हणून नेमणूक झाली.

म्हातारपणामुळं आईवडिलांना घर सोडून राहणं नको वाटतं, म्हणून मी एकटाच करीमनगरला राहतोय.

शनिवारी दुपारी येऊन सोमवारी सकाळी करीमनगरला जात असतो.

नोकरीत चांगला जम बसल्यानंतर लग्न करायचं ठरवल्यानं तूर्तास संसाराचं झेंगट नाही.

आता साडेचार वाजले... अजून दीडतास घालवायला हवा. लवकर पोहोचावं म्हटलं तर.... इथं टॅक्सी-ऑटोची सोय नाही.

चहा तरी घेऊ या असा विचार करत मी रजाक बाबाच्या हॉटेलात शिरलो. हॉटेल म्हणजे नारळांच्या शाखांनी साकारलेली झोपडी. रजाक बाबा या हॉटेलचा मालक. दोन्कलहून येणाऱ्या जाणाऱ्या प्रवाशांचा जणू हा आप्तच. बसच्या प्रतिक्षेत तासन्तास ताटकळणाऱ्या प्रवाशांची तहान-भूक भागवणारा अन्नदाताच.

हॉटेलात येणारा तो गिऱ्हाईक असो वा नसो, बाबा मात्र साऱ्यांचीच मोठ्या आत्मीयतेनं चौकशी करतो.

माठातल्या थंड पाण्यानं तो प्रवाशांची तहान शमवतो, एवढंच नव्हे तर प्रवाशांना हुशारी वाटावी,म्हणून तो त्यांना हात-पाय, तोंड धुण्यास लोट्यानं पाणीही देतो.

अत्यंत कमी दरात चहा-फराळाची व्यवस्था करतो. त्याच्या हातच्या कांद्याच्या भजीची चव न्यारीच.

आसपासच्या खेड्यांतले काही लोक सायकलीवरून इथपर्यंत येतात आणि रजाक बाबाच्या हॉटेलसमोर सायकली लावून सिटी बसनं दूरवर निघून जातात. ते परत येईपर्यंत सायकली सांभाळण्याची जबाबदारी रजाक बाबाचीच असते.

यासाठी तो काहीही शुल्क घेत नाही, म्हणून तर सारे रजाकबाबाचा आदर आणि गौरव करतात.



"बरे आहात ना रजाक बाबा !" हॉटेलात पाऊल ठेवता ठेवता मी विचारलं, "कोण ? दिवाकर. बरा आहेस ना बेटा, कधी आलास ?" भजी तळता तळता आपल्या जाड भिंगाच्या चष्म्यातून पाहत त्यानं विचारलं.

"काय बाबा आज दुपारी भजी तळताहात, सकाळी नाही केलीत भजी ?" "केली होती. संपलीत. त्या तिथं कट्ट्यावर बसलेल्या मंडळींना एल्कटूरला जायचंय म्हणे ! बसला अजून तासाहून अधिक अवकाश आहे. भूक लागलीय. काहीतरी मिळेल का खायला असं त्यांनी विचारलं, म्हणून त्यांच्यासाठी तळतोय."

स्टोव्ह, चहा, फराळाचे पदार्थ.... सारं सामान सायकलीला लावून रजाक बाबा अगदी सकाळीच बस स्थानकावर दाखल होतो.

हॉटेलच्या झोपडीला दारे, कुलूप नसल्याने हॉटेलचं सामान तो यात ठेवू शकत नाही. रात्रीला सारं न्यायचं आणि सकाळच्याला सारं आणायचं, हा त्याचा नित्याचाच क्रम.

सकाळी येताच कांद्याची भजी, मिरचीची भजी, चहा आदी बाबी बनवून ठेवतो. दोन-तीन दिवसांच्या अंतरानं खारा चिवडाही बनवतो.

त्याच्या हॉटेलात बिस्कीटे, पेपरमीट विड्यासुद्धा मिळतात.

"प्लेट भजी आणि चहा द्या बाबा !" मी म्हणालो.

"आधी गरमागरम भजी खा, नंतर चहा करून देईन." बाबा.

भज्यांचा आस्वाद घेता घेता मी माझं संभाषण सुरू केलं.

"तब्येत ढासळीय, प्रकृती बरी नाही का बाबा ?"

"नाही बेटा, हा रमजानचा महिना, उपवासामुळं थकायला होतं."

"मुलगा दरमहा पाच हजार रुपये पाठवत असताना हे काबाडकष्ट कशासाठी बाबा ?"

"मुलगा पैसे पाठवतोय म्हणून घरी बसून खात राहणं, बरं आहे का ? जोपर्यंत हातपाय हलताहेत तोपर्यंत कष्ट करू या. नुसतं बसून खाल्लं तर डोंगरही संपून जाईल."

मुलं पाठवित असलेल्या रकमेच्या दुप्पट खर्च करीत, कर्जबाजारी

होणाऱ्या बापांहून हा रजाकबाबा किती वेगळा ?

बाबाचा मुलगा एजाज माझ्याच वयाचा, सातवीपर्यंत शिकल्यानंतर त्यानं छोटी छोटी कामं करायला सुरुवात केली.

सायकल दुरुस्ती, वडिलांच्या हॉटेलात सप्लायर, सायकलीवरून हिंडत बांगड्या, आईस्क्रीम विकणे ही त्यानं केलेली काही कामं.

आमच्या तालुक्याला वीज येताच, गावचा इलेक्ट्रीक असिस्टंट म्हणून तो नोकरीला लागला.

तो मुळातच हरहुन्नरी आणि कष्टाळू असल्याकारणानं, सहजगत्या ते काम त्यानं आत्मसात केलं.

तालुक्याचं गाव असल्यानं आर्मूर येथे मोटर वाईडींग, पंप, पंखे, मोटर रिपेअरिंग आदी कामे शिकल्यानंतर तो एका एजंटाद्वारे रियाद-सौदी अरेबिया इलेक्ट्रिशियन म्हणून स्थिर झाला.

आता त्याला दरमहा सोळा हजाराचा पगार. पाच हजार वडिलांच्या नावाने आणि पाच हजार बायको नसीम बानूच्या नावाने तो दरमहा दोन्कलच्या स्टेट बँक ऑफ इंडियात जमा करीत असतो.

''रमजानच्या उपवासाच्या काळात तुम्ही घरी राहून आराम का करीत नाही ? या उपवासात तुम्ही पाणीसुद्धा पीत नाही'', संभाषण वाढवत मी म्हणालो.

''उपवासाच्या काळात आराम केल्यास अल्लाला खुषी होत नाही बेटा. यावेळी जितकं जास्त काम तितका जास्त फायदा.''

रमजान महिन्यात मुस्लिम बांधव अत्यंत कडक उपवास करतात. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत ते साध्या पाण्याच्या थेंबालाही शिवत नाहीत, एवढंच काय तोंडातली लाळसुद्धा गिळत नाहीत.

सूर्यास्तानंतर खजूर खाऊन किंवा पाणी पिऊन उपवास सोडतात. त्यानंतर नमाज पढून 'इफ्तार'मध्ये निरनिराळे गोडधोड पदार्थ खातात. कुराणाचे पठण करून झोपी जातात.

सूर्योदय होण्यापूर्वी दोन तास आधी उठून नमाज पढून जेवतात. सूर्योदय



झाल्यानंतर ते पुन्हा उपवासाला प्रारंभ करतात.

या रमजान महिन्यात रजाक बाबा दिवसाकाठी पाच वेळा न चुकता नमाज पढतो. चंद्र दर्शनानंतर रोजे करण्याचे थांबवतो.

या वयातही रजाक बाबानं हे व्रत चालूच ठेवलं होतं. प्रकृतीची फिकीर न करता बाबा उपवास करीत होता.

''प्रकृती बरी नसतानाही यातायात तरी का करता ? तब्येत सांभाळावी आपली,'' मी म्हणालो.

''घरात बसून राह्यलो तर मन रमत नाही. सारं लक्ष इकडंच खेचलं जातं. इथं येऊन साऱ्यांची विचारपूस करीत, गिऱ्हाईकांना काय हवं नको पाहिलं की मन स्थिर होतं.''

''हाताखाली एखाद्या पोराला तरी मदतीला घ्यायचं बाबा !''

''तसं दोन तीन मुलांना हाताखाली घेतलं खरं, पण एक टिकेल तर शपथ ! प्रकृती अस्वस्थतेमुळं हॉटेल बंद ठेवलं की इथं प्रवाशांचे हाल होतात. जाऊ दे, अशीच जिंदगी गुजारीन मी. हातून चार लोकांची सेवा घडली की अल्ला दुवा देईल. जन्नतमध्ये जागा तरी मिळेल.''

भजी खाऊन होताच बाबानं गरम गरम चहा आणून दिला. पुन्हा बाबा भजी तळण्यात मग्न झाले. इलेक्ट्रीशियन एजाजच्या वडिलांच्या हॉटेलात वीज नाही. कमवणाऱ्या मुलाच्या बापाला फुरसत नाही.

बाबांच्या डोळ्यांत मात्र सतत संतृप्तीच दिसायची. एखाद्या वेदान्तीचा चेहरा जसा उजळलेला असावा, अशी कांती बाबांच्या मुखावर सतत राहायची.

रजाकबाबा आर्थिक फायद्यासाठी, पोट भरण्यासाठी हॉटेल चालवत नव्हता.

'यत्न तोच देव जाणावा.'

'मानवसेवा हीच माधव सेवा.'

याचं मूर्तिमंत उदाहरण म्हणजे रजाकबाबा.

स्वत: जळत जळत प्रकाश देतो, तो नंदादीप.

उपवास करीत, प्रकृती बरी नसतानाही प्रवाशांची काळजी वाहतो, असा हा रजाक बाबा !

नंदादीप.

रजाक बाबा.

या दोहोत किती साम्य !

असा विचार करीत मी बसची वाट पाहात थांबलो.

नोकरी मिळत नाही म्हणून शासनाचा धिक्कार करण्यात गुंतलेल्या युवा पिढीला - ही स्वयंरोजगाराची कल्पना का बरं सुचू नये ?

रजाक बाबाची वाट चोखाळता नाही आली, तरी जगण्यासाठी एखाद्या मार्गाचा अवलंब करता येईलच ना !

वाहनांची काहीच सोय नसलेल्या या दोन्कलमध्ये निदान ऑटो चालवली तरी नोकरीचा प्रश्न सुटेल.

रजाकबाबासारख्या नंदादीपाच्या प्रकाशात आजच्या युवापिढीनं मार्ग शोधायला काय हरकत आहे ?

**लेखक - अंबल्ला जनार्दन**
**अनुवाद - लक्ष्मीनारायण बोल्ली**

●●●

तेलुगु
बालभारती :
इयत्ता ८ वी : १९९९



# १६. बंडलबाज ज्योतिषी

विद्याभ्यास नसलेला एक रिकामटेकडा जावई गावोगाव भटकून शेवटास सासरी पोहचला. सासूबाईंना काहीतरी गोडधोड करून खाऊ घालावे, असं वाटलं; परंतु जावई तर खादाडबकासूर. केलेले सर्व पदार्थ तो एकटाच फस्त करून टाकील या भीतीनं जावई घरात नसताना सासूबाईनं स्वयंपाकाला सुरुवात केली. स्वयंपाक होईतोपर्यंत बाहेर जाऊन येतो असे सांगून जावई बाहेर पडला. सासूबाई आणि मेव्हणीच्या नजरेला न पडता तो परसात जाऊन लपून बसला. सासूबाईनं चकल्या तळायला सुरुवात केली. चकली तेलात पडताच 'चर्रर्र' असा आवाज होऊ लागला. जितक्या वेळा 'चर्रर्र' चा आवाज झाला, तितक्या चकल्या सासूबाईंनी केल्या, अशी खूणगाठ त्यानं मनात बांधली. त्यानंतर पुन्हा गावात भटकून काहीच माहीत नसल्यासारखा तो घरी परतला. "स्वयंपाक झाला आहे, हातपाय धुऊन पानावर बसा," असं सासूनं सांगितलं. जावई हातपाय धुऊन पानावर बसला. चकल्याखेरीज सासूनं सारे पदार्थ पानात वाढले. तेव्हा त्यानं चकल्या वाढायला सांगितलं. "घरात चकल्या कुठायत ? काहीतरी विचारू नका." सासू कडवटपणे बोलली. "तुम्ही एकशेबत्तीस चकल्या केल्यात. खोटं वाटत असेल तर मोजून पाहा." जावयानं प्रत्युत्तर दिलं.

आता आपलं बिंग बाहेर पडणार हे ओळखून सासू खोटंखोटं हसत म्हणाली, "जावईबापू ! तुमच्या मेव्हणीनं तुमची गंमत करायची ठरवल्यानं मला मेलीला असं वागावं लागलं. ठीक, घरात चकल्या केल्यात हे कळलं तुम्हांला, परंतु त्याची संख्या तुम्हांला कशी कळली ?"

"माझ्या पूर्वपुण्याईच्या बळावर हे मला कळलं, पण या चौकशा तुम्हांला कशाला ? तुम्ही चकल्या केल्यात हे खरं की नाही एवढं सांगा !" तो म्हणाला.

जेवल्यानंतर सासूनं शेजारपाजाऱ्यांना एकत्र बोलावून जावई मोठा ज्योतिष विशारद असल्याचं सांगितलं. पाहता पाहता ही बातमी साऱ्या गावभर पसरली. याच दरम्यान गावातल्या एका धोब्याचं गाढव हरवलं. तो

धोबी गाढवाच्या शोधार्त हिंडून हिंडून शेवटास ज्योतिषाकडं आला आणि म्हणाला,

"ज्योतिषीबुवा, माझं गाढव हरवलं आहे. ते कुठं सापडेल?" जावयाला तर ज्योतिष शास्त्रातलं ओ की ठो कळत नव्हतं. 'या गावात माझी कीर्ती ज्योतिषी म्हणून झाली आहे. या कीर्तीचा फायदा धनलाभासाठी करायला काय हरकत आहे,' असा मनोमन विचार त्यानं केला. गडी खुशीत आला; पण अशा ज्योतिषविषयक प्रश्नांना सतत उत्तरं द्यावी लागतात आणि तीही बरोबर. आपण तर बंडलबाज ज्योतिषी, मग काय करावं ? चला आता प्रसंग आलाच आहे तो तरी निस्तरूया म्हणत, त्यानं उगीचच आकाशाकडं पाहात, बोटं मोजत, ओठातल्या ओठात पुटपुटत तो म्हणाला, "हे पाहा धोबीदादा ! आज रात्रभर अभ्यास करून उद्या सकाळी तुमच्या प्रश्नाचं उत्तर देईन, आता या तुम्ही." रात्रीच्या जेवणानंतर कुणाला न सांगता गाढवाला शोधण्यासाठी तो बाहेर पडला. गाढवाचा ठावठिकाणा मी नाही सांगितला, तर लोकांचा माझ्यावरचा विश्वास उडून जाईल. 'शेंडी तुटो की पारंबी तुटो' आता गाढवाला शोधलंच पाहिजे, असे म्हणत तो हिंडू लागला. बागा, रस्ते, मळे शेती सगळीकडं शोधता शोधता एकदाचं त्याला गाढव सापडलं. त्याला खूप आनंद झाला. त्यानं ते गाढव गावाबाहेरच्या एका ताडाच्या झाडाला बांधून टाकलं आणि गुपचूपपणे घरी येऊन तो झोपला.

सकाळी उठून घरासमोरच्या कट्ट्यावर तो दात घासत बसला असताना, धोबी अत्यंत रडवेल्या चेहऱ्यानं त्याच्यासमोर उभा राहीला, तेव्हा तो जावई मोठ्या पंडिताचा आव आणत म्हणाला, "धोबीदादा, काल रात्रभर तुझ्या गाढवाच्या शोधार्थ खूप खूप अभ्यास करावा लागला. शेवटी गाढवाचं ठिकाण गणितातून सापडलं. पूर्वेला असलेल्या तलावाच्या पश्चिम दिशेला असलेल्या वनराईत, एका ताडाच्या झाडाला त्या गाढवाला कुणीतरी बांधून ठेवलेलं आहे. तू तिथं जाऊन गाढवाला ताब्यात घे."

धोब्याच्या आनंदाला पारावार उरला नाही. तो पळतच वनराईकडं गेला. खरंच तिथं गाढवाला बांधलेलं होतं. धोब्यानं जावयाला हातावर चार रुपये



ठेवून कृतज्ञतेनं त्याच्या पायावर लोळण घेतली. वाऱ्याच्या वेगानं जावयाची कीर्ती राज्यभर पसरली.

याच दरम्यान राजाच्या महालात चोरी झाली. काही केल्या चोराचा पत्ता सापडेना. राजानं या जावई ज्योतिषीची कीर्ती ऐकून त्याला राजवाड्यावर बोलावून घेतलं आणि चोरीचा छडा लावलाच पाहिजे अशी आज्ञा केली. 'जर चोरी नाही सापडली, तर तुझं नाक आणि कान छाटले जातील, असा सज्जड दमही राजानं भरला. हे ऐकून जावयाला कापरं भरलं. 'यावेळी माझं बिंग नक्कीच फुटेल आणि मला नाक आणि कान गमवावे लागतील.' या भीतीनं तो आतल्याआत धास्तावून गेला. राजानं यासाठी त्याला एका आठवड्याची मुदत दिली. जावयाची अक्षरश: तहानभूक हरपली. त्याला झोप लागेना. सतत तो 'राम राम' जप केल्याप्रमाणे 'नाक, कान' असं बडबडू लागला.

राजाच्या महालात कर्णिका आणि नासिका नावाच्या दोन सेविका होत्या. त्या दोघींनी संगनमत करून राजमहालातून राणीचे दागिने चोरले होते. जावई मोठा ज्योतिषी असल्याची बातमी त्यांच्या कानावरही आलीच होती. हा ज्योतिषी आपल्याला पकडून देईल की काय? अशी भीती त्यांच्या मनात दाटली. त्या दोघी घाबरत घाबरत ज्योतिषी काय करतोय हे पाहण्यासाठी लपतछपत जावयाच्या घरी रात्रीच्या वेळी आल्या. त्यावेळी तो घरात कान आणि नाक छाटलं जाईल या भीतीनं 'कर्णिका-नासिका' असं पुटपुटत बसलेला त्यांना दिसला. 'अरे देवा ! याला तर आमची नावं माहीत झालीत. हा आता नक्कीच आपल्याला राजाच्या हवाली करणार आणि राजा आपल्याला फासावर चढवणार !' त्या दोघींची भीतीनं गाळणच उडाली. आता त्याच्या पायावर लोळण घेऊन क्षमा मागितल्याशिवाय आपले प्राण वाचणार नाहीत, याची त्यांना खात्री पटली. त्या दोघी हमसून हमसून रडू लागल्या.

रडण्याचा आवाज ऐकून जावई घराबाहेर आला. त्याला समोर पाहताच त्या दोघींनी त्याच्या पायावर लोळण घेतली. "आम्हांला क्षमा करा. आम्हीच

कर्णिका, नासिका आहोत. आम्हीच राणीचे दागिने चोरले आहेत. या संकटातून आम्हांला सोडवा, आम्ही जन्मभर तुमचे उपकार विसरणार नाही. आम्ही चोरलेले दागिने तुमच्या स्वाधीन करतो. बिनबोभाट एवढं प्रकरण मिटवा,'' त्या दोघी कळवळून बोलल्या.

जावयाला या घटनेचं आश्चर्य वाटलं. आपण 'कर्णिका, नासिका' एका अर्थानं म्हणत होतो. यांना त्यातून वेगळाच अर्थ गवसला. चला याही वेळी आपलं नशीब जोरावर आहे. मी एक तज्ज्ञ ज्योतिषी असल्याच्या कीर्तीवर आता तर राजमुद्राच उमटेल. मग काय, राजज्योतिषी म्हणून माझी ख्याती होईल आणि दररोज दोन वेळा जेवणावर आडवा हात मारायला नशीबच ताट वाढून समोर ठेवील. तो मनातल्या मनात संतुष्ट झाला.

''पाहिलंत ! मी ज्योतिष शास्त्रात किती पारंगत आहे ते. माझ्या ज्ञानापुढं कुणीही टिकू शकत नाही. चोरलेले दागिने माझ्या स्वाधीन करून तोंड काळे करा इथून.'' तो जरा घुश्श्यातच बोलला.

त्या दोघी चोरलेले दागिने त्याच्या स्वाधीन करून निघून गेल्या. जावयाने ते दागिने एका तलावाच्या बांधाजवळ पुरून टाकले आणि गुपचूप घरी जाऊन तो झोपला.

दुसऱ्या दिवशी मोठ्या थाटात तो राजदरबारात हजर झाला. राजानं मोठ्या कुतुहलानं त्याला विचारलं, ''काय ज्योतिषी महाराज, लागला का छडा चोरीचा ? मिळतील का आमचे दागिने आम्हांला परत ?''

''होय महाराज ! चोरांनी तुमचे दागिने गावच्या तलावाच्या बांधाजवळ पुरून ठेवले आहेत,'' जावई मोठ्या आत्मविश्वासानं बोलला.

लगेच राजानं आपल्या सेवकांना तिकडे धाडलं. खरंच तिथं दागिने होते. राजा संतुष्ट झाला. राजानं ज्योतिषाला सोनंनाणं देऊन मोठा सन्मान केला. आता या ज्योतिषाची कीर्ती दशदिशेला पोहोचली.

राजा ज्योतिषाला घेऊन सर्वत्र हिंडू फिरू लागला. राजाचा मित्र, राज ज्योतिषी म्हणून त्याला राजाइतका मान मिळू लागला. एकदा राजा



ज्योतिषाला घेऊन वनविहाराला गेला. यावेळी अचानक एक टोळ त्या राजाच्या हातावर बसला. राजानं त्या टोळाला गुपचूप आपल्या मुठीत बंद करून ठेवला. ही बाब जावयाच्या नजरेस पडली नाही. ज्योतिषाची परीक्षा पाहण्यासाठी राजानं त्याला विचारलं, ''बोल, माझ्या मुठीत काय आहे ?''

राजाचे हे शब्द ऐकताच जावयाची अगदी पाचावर धारण बसली. आता माझं ढोंग निश्चितपणे बाहेर पडेल. मी एक बंडलबाज ज्योतिषी असल्याचं लोकांना कळेल, परंतु अज्ञानाची कबुली देणं बरं नाही, हे उमजून तो म्हणाला,

''चकल्या मी मोजल्या चर्रर चर्रर ऐकून
गाढव मी शोधिले रात्रभर हो हिंडून
दागिने ते कळले, कान नाकाच्या कृपेने
आता रे टोळा, मरशील राजाच्या रागाने

चर्रर आवाजानं मी चकल्याची संख्या मोजली. रात्रभर हिंडून गाढवाचा शोध घेतला, कान, नाक छाटले जातील या भीतीच्या उच्चाराने दागिने हस्तगत केले. अशा प्रकारे फुकटात पिकावर धाड घालणाऱ्या टोळा, आता तुझं मरण निश्चित आहे.'' राजाला त्याचं काव्य कळलं नाही; पण टोळाला आपण मुठीत पकडलं हे ज्योतिषानं बरोबर ओळखलं एवढं कळलं.

राजाला परमानंद झाला. राजा म्हणाला, ''आपल्यासारखे पंडित दुर्मिळ, हे राजज्योतिषी, हा सारा परगणा तुला मी बक्षीस म्हणून देत आहे.''

एकंदरीत सामान्य बुद्धी असलेल्या राजाजवळ, एक बुद्धिहीन माणूस केवळ नशिबाच्या ज़ोरावर महनीय ज्योतिषी बनला एवढी गोष्टी खरी.

**लेखक - कलाप्रपूर्ण चिलकमर्ती लक्ष्मीसिंहागारू**
**अनुवाद - लक्ष्मीनारायण बोल्ली**

●●●

तेलुगु
बालभारती
इयत्ता ७ वी : १९९८

| | | |
|---|---|---|
| प्रथमावृत्ती : २००२<br>विशेष आवृत्ती : २०१० | | © महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक संशोधन मंडळ पुणे - ४११००४. |
| कथानिवड व संपादन सहाय | : | कन्नड - के. एस. हेगडे, विद्यासचिव - भाषा<br>हिंदी - अलका पोतदार, विशेषाधिकारी - हिंदी<br>उर्दू - मोमीन जी. एन., विशेषाधिकारी - उर्दू<br>तेलुगु - तुलसी भारत, विशेषाधिकारी - तेलुगु<br>गुजराती - केतकी जानी, विशेषाधिकारी - गुजराती<br>मराठी - उषादेवी देशमुख, विशेष सहायक - मराठी |
| मुखपृष्ठ | : | चंद्रकांत तजबिजे |
| निर्मिती | : | श्री. सच्चिदानंद आफळे, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. सुनिल कसबेकर, निर्मिती अधिकारी |
| अक्षरजुळणी | : | मुद्रा विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४. |
| कागद | : | ७० जीएस्‌एम्, क्रीमव्होव |
| मुद्रणादेश | : | न/टेक - २०१०-११ (३५,०००) |
| मुद्रक | : | राजेश आर्ट लोअर परेल-मुंबई. |
| प्रकाशक | : | श्री. विवेक उत्तम गोसावी<br>नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ<br>प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५. |